# LIB 013

## ग्रंथालय आणि माहितीशास्त्र : घटना, घडामोडी, भाष्य






*निर्मिती*

श्री. आनंद यादव, व्यवस्थापक, ग्रंथनिर्मिती केंद्र, य. च. म. मुक्त विद्यापीठ

अक्षरजुळणी : मे. परफेक्ट कॉम्प्युटर, त्रिमुर्ती चौक, सिडको, नाशिक.

मुद्रक : श्री. प्रशांत राका, मे. राका प्रिंटर्स, कावेरी संकुल, अशोकस्तंभ, नाशिक.

*प्रकाशक*

डॉ. दिनेश भोंडे, कुलसचिव, य. च. म. मुक्त विद्यापीठ, नाशिक-४२२२२२

---

**पत्रव्यवहाराचा पत्ता**

**वर्गणी व व्यवस्थापन –** डॉ. मधुकर शेवाळे, उप-ग्रंथपाल व प्रमुख, ग्रंथालय आणि माहितीस्रोत केंद्र, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक ४२२२२२.

**संपादकीय (साहित्य पाठविण्यासाठी)**–डॉ. मधुकर शेवाळे, उप-ग्रंथपाल व प्रमुख, ग्रंथालय आणि माहितीस्रोत केंद्र, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक ४२२२२२.



**B19-20-**

# ज्ञानगंगोत्री

वर्ष २०वे | ज्ञानगंगोत्री : डिसेंबर २०१९ ते मे २०२० | अंक – ३ व ४

ISSN 2231-6507

## *अनुक्रमणिका*

## संपादकीय

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाच्या ग्रंथालय आणि माहितीशास्त्र शिक्षणक्रमाच्या पदव्युत्तर शिक्षणक्रमासाठी 'ज्ञानगंगोत्री' हे त्रैमासिक मागील १९ वर्षापासून अव्याहतपणे प्रकाशित होत आहे. या त्रैमासिकाची उपयुक्तता फक्त विद्यार्थी यांच्यासाठीच नसून ग्रंथपाल आणि सामान्य वाचकांसाठीही ज्ञानाचा महत्त्वपूर्ण खजिना आहे. या त्रैमासिकातील माहितीस अनुसरून पीएच.डी. व एम.लिब. आय.एस्सी. शिक्षणक्रमाच्या विद्यार्थ्यांनी आशय विश्लेषण करून आपले प्रबंध, प्रबंधिका विविध विद्यापीठांना सादर केलेल्या अहेत. ज्ञानगंगोत्रीमधील आशय अधिकाधिक उपयुक्त करण्यावर विद्यापीठाचा नेहमीच भर असतो. यासंदर्भात वाचकांच्या सूचनांचे स्वागतच आहे.

प्रस्तुत अंकामध्ये इलेक्ट्रॉनिक पब्लिशिंग आणि इंटरनेट सुविधा यामुळे प्रकाशन व्यवसायाचे बदललेले स्वरूप व त्याचा ग्रंथालयांवर होत असलेला परिणाम या अनुषंगाने नवीन प्रकाशन मॉडेल्स आणि ग्रंथालये या लेखाच्या माध्यमातून भाष्य करण्यात आले आहे. वाचनसाहित्यचे वर्गीकरण करण्यासाठी विविध पद्धती उपयोगात आणण्यात येतात. युडीसी (युनिव्हर्सल डेमिसल क्लासिफिकेशन) ही एक पद्धती आहे. या पद्धतीचा उगम विकास आणि तिचे उपयोजन यासंदर्भात परिपूर्ण माहिती देण्याचा प्रयत्न आहे. ग्रंथालयाचे बदलते स्वरूप विशेषत: वाचनसाहित्याचे संघटन करण्याच्या दृष्टीकोनातून कुशल मानव संसाधनाची गरज कशी आहे याबाबींची चर्चा दुसऱ्या लेखात केली आहे. Social Epistemology या संकल्पनेच्या विस्तारासाठी प्रा. जे. एच. शेरा यांची सातत्याने प्रयत्न केलेत. शेरा यांनी जो विचार केला त्यासंदर्भातील तत्त्वप्रणाली दाने भागांमध्ये चर्चिली आहे. ही प्रणाली ग्रंथालयांना लावुन कशी तपासता येईल हे पाहणेही महत्त्वाचे ठरेल. तंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे संगणकाधारित कार्ये तसेच बैठे काम किंवा अति काम यामुळे विविध विकार उद्‌भवतात. अशा व्यवसायजन्य आजारातून ग्रंथालय कर्मचारीही सुटलेले नाहीत. त्यामुळे अर्गोनॉमिक्स या विषयाचे महत्त्व व त्याचा ग्रंथालयात सुयोग्य वापर होण्याच्या दृष्टीकोनातून विवेचन करण्यात आले आहे. महाराष्ट्रात १२,१९१ सार्वजनिक ग्रंथालये आहेत. या ग्रंथालयांनी नित्याच्या उपक्रमांबरोबर कोणते नावीन्यपूर्ण उपक्रम राबवावेत यावरही भाष्य करण्यात आले आहे, त्याचबरोबर मोल्सवर्थपूर्व कोशनिर्मितीचे जे

प्रयत्न झालेत त्यावरील चर्चा येथे देत आहोत. हे सर्व लेख ग्रंथालय आणि माहिती शास्त्राच्या विद्यार्थ्यांसाठी अतिशय उपयुक्त असल्याने पुर्नप्रकाशित करण्यात येत आहेत. या अंकातील संपूर्ण आशय विद्यार्थ्यांना उपयुक्त ठरेल अशी आशा करतो.

सर्व विद्यार्थ्यांना अंतिम परीक्षेच्या शुभेच्छा !

डॉ. मधुकर शेवाळे
संपादक

# नवीन प्रकाशन मॉडेल्स आणि ग्रंथालये

**डॉ. राजेंद्र कुंभारे**

इलेक्ट्रॉनिक पब्लिशिंग आणि इंटरनेटची सुविधा यामुळे प्रकाशन व्यवसायाचे स्वरूप बदलले आहे. त्याचा परिणाम ग्रंथालयांवरही होत आहे. सदर लेखामध्ये प्रकाशनांच्या नवीन मॉडेल्सबाबत चर्चा केलेली आहे.

## प्रस्तावना

ग्रंथालये आणि प्रकाशन यांचे संबंध पूर्वीपासून आहेत. हे संबंध घनिष्ठ आहेत. तसेच क्लिष्टही आहेत. ग्रंथालये आणि प्रकाशक एकाच समान उद्देशाने कार्य करत असतात. 'गरजूंना हवी असलेली माहिती पुरविणे' हाच दोघांचाही मुलभूत हेतू आहे. मात्र हा सरळ साधा हेतू साध्य करण्यामध्ये अनेक अडथळे, आव्हाने आहेत. जसे, ग्रंथालयांकडील मर्यादित आर्थिक साधने, अमर्यादित व बहुविध माहितीच्या गरजा, सातत्याने विकसित होणारी नवीन स्वरूपातील माहिती साधने, इत्यादी. ग्रंथालयांच्या तुलनेत प्रकाशकांचे उत्तरदायित्व अनेक घटकांशी असते. जसे, ग्रंथालये, वाचक, प्रकाशकांचे कर्मचारी, त्यांचे सहव्यावसायिक, भागधारक, इत्यादी. ग्राहकांचेसुद्धा प्रकाशकांच्या दृष्टीने दोन प्रकार होतात. 'अंतिम वाचक' आणि 'ग्रंथालये'. याशिवाय इलेक्ट्रॉनिक, माहिती-तंत्रज्ञानातील वेगाने होणारे बदल आणि वाढती स्पर्धा ही प्रकाशकांची आव्हाने आहेत. स्पर्धेत टिकून राहण्यासाठी प्रकाशक 'योग्य वाचनसाहित्य' प्रकाशित करतात. दर्जेदार वाचनसाहित्य स्वस्त/कमी किमतीला आणि वेगाने उपलब्ध करणे याला 'योग' असे म्हणता येईल. 'योग वाचनसाहित्य' उपलब्ध करण्यासाठी प्रकाशक पुढील कार्ये करतात.

## प्रकाशकांची कार्ये

(१) परिषदा, संपादक मंडळाच्या बैठका, शैक्षणिक संकुले आणि प्रयोगशाळा यांच्या भेटी दरम्यान ग्रंथालय आणि शास्त्रज्ञांशी प्रकाशक चर्चा करतात.

(२) अशा चर्चेवर आधारित वाचनसाहित्य प्रकाशित करण्याबाबतचा निर्णय घेतात, धोका पत्करतात, गुंतवणूक करतात, वाचनसाहित्य प्रकाशित करतात आणि त्यातून शास्त्रज्ञांच्या माहितीविषयक गरजांची पूर्तता करण्यासाठी पुढाकार घेतात.

(३) त्यानुसार नवीन माहितीसाधने विकसित करतात, त्यांचे वितरण आणि विपणन करतात.

(४) ग्रंथपाल तसेच नियतकालिकाच्या संपादकपदी व संपादक मंडळावर शास्त्रज्ञांची नियुक्ती करतात. त्यांना भरीव मोबदला देतात.

(५) लेखक-संपादकांना लेख लिहिण्यासाठी ऑनलाईन सेवा, मार्गदर्शन पुरवितात.

(६) मुद्रित आणि ऑनलाईन प्रकाशनासाठी वाचनसाहित्य तयार करतात. यामध्ये वाचनसाहित्याचे संपदन करणे, एक्सएमएल (XML) टॅग देणे, मुद्रणदोष तपासणे, मुद्रण व बाईंडिंग करणे, वाचनसाहित्य ऑनलाईन यंत्रणेद्वारे उपलब्ध करणे, इत्यादी कार्यांचा समावेश होतो. आशय व्यवस्थापन यंत्रणेमध्ये (Content Management System) आशय सादर करणे, सार व निर्देश नियतकालिकांच्या प्रकाशकांना आशय पुरविणे याही कार्यांचा समावेश प्रकाशकांच्या अलीकडच्या कार्यांमध्ये होतो.

## ग्रंथालये आणि प्रकाशक सहकार्याची संभाव्य क्षेत्रे

ग्रंथालये आणि प्रकाशक 'उपभोक्त्यांना हवे असलेले वाचनसाहित्य पुरविणे' या समान हेतूने कार्य करतात. पर्यायाने त्यांनी एकमेकांना सहकार्य केल्यास सदर हेतू साध्य करणे सुलभ होणार आहे व आर्थिक बचत होऊन परिणाकारक वाढणार आहे. ग्रंथालये आणि प्रकाशक यांना एकमेकांचे सहकार्य दृढ करण्यासाठी पुढील संभाव्य क्षेत्रे उपलब्ध आहेत.

### (अ) प्रमाणके

ग्रंथालये आणि प्रकाशक समान संरचना/प्रमाणके तयार करण्यासाठी अनेक वर्षांपासून एकत्रित कार्य करत आहेत. त्याचे उत्तम उदाहरण म्हणजे, आय.एस.बी.एन.; आय.एस.एस.एन.; सी.आय.पी. डेटा, इत्यादी

सध्याच्या डिजिटल माहितीच्या युगामध्ये माहिती/ज्ञान उपभोक्त्यांपर्यंत प्रभावीपणे पोहचविण्यासाठी ग्रंथालये आणि प्रकाशक अनेक प्रकल्पांमध्ये

एकत्रितपणे कार्य करत आहेत. त्यातून डिजिटल माहितीच्या वितरणासाठी अनेक प्रमाणके तयार झाली आहेत. ANSI / NISO या संस्थेने पुढील प्रमाणके तयार केली आहेत : (i) Open URL (Z39.88) (ii) Digital Object Indentifier Syntax (Z39.84) (iii) Dublin Core (Z39.85)

## (आ) किंमत आकारणी पद्धती

प्रकाशक डिजिटल प्रकाशनाच्या किमतीबाबत ग्रंथालयांना पुढील बाबतीत सहकार्य करू शकतात किंवा ग्रंथालये आणि प्रकाशक यांच्या सहकार्यावर आधारित किमतीबाबत पुढील स्वरूपाचे सहकार्य असू शकते.

(१) **बिग डील मॉडेल :** या प्रकारच्या किंमती आकारणी मॉडेल्सनुसार विशिष्ट किंमतीमध्ये अनेक नियतकालिके ग्रंथालयांना वापरता येतात. अर्थात अशा कन्सोर्शियामधील सर्वच नियतकालिके वापरली जातात असे नाही.

(२) **वापरानुसार किंमत आकारणी (Pay Per Use) :** या प्रकारच्या किंमत आकारणी मॉडेलमध्ये उपभोक्ते/ग्रंथालये जेवढे लेख डाऊनलोड करतात तेवढ्याच लेखांचे पैसे ग्रंथालयास द्यावे लागतात.

दोन्ही प्रकारच्या मॉडेल्समध्ये फायदे-तोटे आहेत. ते दूर करण्यासाठी ग्रंथालये आणि प्रकाशकांना अधिक सहकार्याची आवश्यकता असते.

## (इ) डिजिटल आशयाचे जतन

मुद्रित वाचनसाहित्याचे जतन ग्रंथालये वर्षानुवर्षे करत आहेत. परंतु डिजिटल आशयाचे (Digital Content) जतन कोणी करावयाचे याबाबत अजून एकमत होत नाही. कारण असा आशय प्रकाशकाच्या सर्व्हरवर असतो म्हणून ग्रंथालये त्याचे जतन करू शकत नाहीत. परंतु प्रकाशकाने आपला व्यवसाय बंद केला तर त्याच्याकडील आशय मिळण्यामध्ये ग्रंथालयास अडचणी येऊ शकतात. यासंबंधी 'प्रकाशकांवर विश्वास' या अनुषंगाने पुढील प्रश्न सोडविण्यासाठी ग्रंथालये आणि प्रकाशक यांच्यामध्ये सहकार्य आवश्यक आहे.

(१) आशय जतन करण्यासाठीचा तसेच मेटाडेटासंबंधीचा फॉरमॅट कोणता असावा?

(२) कोणता आशय जतन करणे अनिवार्य असावे आणि कोणता आशय जतन करणे ऐच्छिक असावे?

(३) जो फॉरमॅट आशय जतन करण्यासाठी सध्या वापरला आहे तो भविष्यात उपयोगी पडेल कां?

या आणि अशाच प्रकारच्या इतर प्रश्नांची उत्तरे मिळण्यासाठी प्रकाशनांची नवीन मॉडेल्स उदयास येत आहेत.

## प्रकाशनांची नवीन मॉडेल्स

नियतकालिक हे संशोधनाचे निष्कर्ष संप्रेषित करण्याचे महत्त्वाचे साधन आहे. शैक्षणिक नियतकालिके 'Peer Reviewed' या गुणवत्ता नियंत्रण यंत्रणेच्या कसोट्यांना उतरलेले दर्जेदार लेख गेली अनेक वर्षे प्रकाशित करत आहेत. प्रकाशनाचे हे मॉडेल खूप यशस्वी ठरले आहे. हे मॉडेल परीक्षणाधारित असल्यामुळे माहितीच्या ओझ्यापासून (Information Overload) शास्त्रज्ञांचा काही प्रमाणात का होईना बचाव झाला आहे. शिवाय प्रभाव मूल्याकांच्या (Impact Factor) मोजमापामुळे, थोड्या प्रमाणात का होईना, नियतकालिकाचे, त्यातील लेखांचे व पर्यायाने लेखकांच्या दर्जाचे मोजमाप करणे शक्य झाले आहे. अशा या गुणवत्ता नियंत्रित नियतकालिकातील आशय उपभोक्त्यांपर्यंत पोहोचविण्याचे माध्यम म्हणून ग्रंथालये महत्त्वाची भूमिका निभावत आहेत.

परंतु आता इलेक्ट्रॉनिक प्रकाशनामुळे वर नमूद केलेल्या प्रस्थापित प्रकाशन यंत्रणेस नवीन संधी/पर्याय उपलब्ध झाले आहेत. या संधी/पर्यायांमुळे नवीन प्रश्नही निर्माण झाले आहेत. जसे,

(१) इंटरनेटद्वारे हवा तेवढाच लेख ग्रंथालयास उपलब्ध होत असेल तर संपूर्ण नियतकालिक उपार्जित करणे गरजेचे आहे कां?

(२) कोणताही लेखक आपले लेख स्वत:च इंटरनेटवर सादर करू (Up-load) शकत असेल व त्याची त्वरीत समीक्षा करून टीका-टिप्पणी करू शकत असेल तर गुणवत्ता नियंत्रण यंत्रणेची (Peer Review) आवश्यकता आहे कां?

(३) इंटरनेटवरील इलेक्ट्रॉनिक माहितीचे भविष्यकालीन उपयोगासाठी जतन होणार कां?

या व अशा प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे मिळविण्यासाठी प्रकाशकांना नवीन प्रकाशन मॉडेल्स स्वीकारावी लागतील. नवीन प्रकाशन मॉडेल्स पुढील स्वरूपाची असू शकतील.

### (अ) स्वयं प्रकाशन (Self Publishing)

या मॉडेलनुसार लेखक स्वत:चे लेख स्वत:च इंटरनेटवर प्रकाशित करू शकतात. गगल आणि इतर सर्च इंजिनद्वारे अशा लेखांची निर्देश नोंद होते. डिजिटल वस्तू परिचय (Digial Object Identifier) यंत्रणेचा वापर करून या लेखांची नोंद व शोध शक्य होते. तसेच या Open Archives Initiative Protocol for Metadata Harvesting नियमावलीनुसार अशा लेखांचा शोध घेता येतो.

अशा परिस्थितीत लेखाची गुणवत्ता नियंत्रण यंत्रणा (Peer Review) कशी कार्य करणार? कोणतीच गुणवत्ता नियंत्रण नाही अशी तरी परिस्थिती उद्‌भवले किंवा अमेझॉन.कॉमवरील 'वाचकांची केलेले परीक्षण' (Readers' Review) सारखी यंत्रणा अस्तित्वात येईल. अर्थात, नामांकित नियतकालिक प्रकाशकांकडील गुणवत्ता नियंत्रण यंत्रणेचे फायदे लेखक सोडून देण्यास तयार होतील का हा प्रश्न अनुत्तरितच राहतो.

### (आ) संस्थात्मक डिजिटल वाचनसाहित्य संग्रह (Institutional Repositories)

लेखक/संशोधक ज्या संस्थेत कार्यरत असतो त्या संस्थेने त्याचे लेख संस्थात्मक डिजिटल संग्रहाद्वारे इंटरनेटवर उपलब्ध करावे असे लेखकांना/संशोधकांना वाटणे शक्य आहे. सध्या जगभरात अनेक संशोधन संस्था आणि विद्यापीठांनी असे संग्रह विकसित केले आहेत. प्रकाशनाचे हे आणखी एक नवीन मॉडेल आहे. परंतु त्यातही पुढील प्रश्न उद्‌भवतात. लेखक/संशोधक आपले लेख/अहवाल संस्थांना प्रकाशनासाठी देतील कां? संस्था/विद्यापीठांना असे संग्रह करणे, त्यांची देखभाल करणे आर्थिकदृष्ट्या परवडेल कां? व्यावसायिक संस्था असे संग्रह तयार करण्यामध्ये भागीदार होतील कां? या प्रश्नांची उत्तर काळच देईल.

### (इ) मोफत नियतकालिके (Open Access Journals)

सध्या अनेक नियतकालिके इंटरनेटवर मोफत उपलब्ध आहेत. अशा

नियतकालिकांमध्ये लेख छापण्यासाठी लेखक प्रकाशकांकडे 'प्रकाशक शुल्क' (Fee to Publish) भरतात. या मॉडेल्समध्ये नियतकालिकाच्या प्रकाशन खर्चाचा भार वाचकांऐवजी (किंवा ग्रंथालयाऐवजी, कारण ग्रंथालये वर्गणी भरतात) लेखकांवर पडतो. सुरुवातीस असे शुल्क ५०० ते १५०० डॉलर एवढे होते. आता ते ३००० ते ६००० डॉलर झाले आहे. लेखक एवढे प्रकाशन शुल्क भरणार कां? व हे प्रकाशन मॉडेल स्थिरावणार कां? याबद्दल साशंकता आहे.

## सारांश

ही मॉडेल्स एकमेकांपासून पूर्णत: भिन्न नाहीत. त्यांची वैशिष्ट्ये एकमेकांत मिसळलेली आहेत. पर्यायाने भविष्यात उपभोक्त्यांच्या वेगवेगळ्या गरजांची पूर्तता करणारी प्रकाशनांची 'मिश्र मॉडेल्स' यशस्वी होण्याची शक्यता आहे.

टीप : सदर लेख खालील लेखावर आधारित आहे.

Dyck, Craig Van and Mckenzie, Christopher (2004), The evolving relationship between libraries and scholarly publishers : metrics and models. In Nitecki, Danuta A. Ed. Advances in librarianship Vol. 28, Amsterdam, Elsevier P.P. 95-119.

# युनिव्हर्सल डेसिमल वर्गीकरण पद्धती : उगम, विकास आणि सद्य:स्थिती

**डॉ. नंदकुमार भा. दहिभाते**
प्रिन्सिपल टेक्निकल ऑफिसर, राष्ट्रीय रासायनिक प्रयोगशाळा, पुणे
nb.dahibhate@ncl.res.in

## सारांश

ग्रंथालय वर्गीकरण पद्धतीचा इतिहास साधारणत: १८७६ मध्ये मेलविल डेव्ही यांच्या दशांश वर्गीकरण पद्धतीच्या (Dewey Decimal Classification) प्रकाशनापासून सुरू झाला. तेव्हापासून ते सद्य:स्थितीत ग्रंथालय वर्गीकरण पद्धतीत बराच विकास होत राहिला व या पद्धती काळाप्रमाणे अद्ययावत ठेवण्याचा प्रयत्न राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय संस्था तसेच ग्रंथपालांनी केला. या कालावधीत सामान्य (General) तसेच विशेष (Special) वर्गीकरण पद्धती विकसित झाल्या व त्यांनी ग्रंथालय वर्गीकरणास योग्य ती दिशा व स्थान मिळवून दिले.

ग्रंथालय वर्गीकरण पद्धतीच्या सुधारणेविषयी बऱ्याच परिषदांमधून, चर्चासत्रातून, अभ्यासकांच्या व ग्रंथालयांच्या चर्चाद्वारे वर्गीकरण पद्धती अद्ययावत ठेवण्याचा प्रयत्न केला गेला. यामुळे स्थूल तसेच सूक्ष्म प्रकारच्या विषयांना वर्गीकरण पद्धतीत सामावून घेऊन सुलभता निर्माण केली. या लेखाद्वारे युडीसीच्या विकासाचा सारांशरूपी विचार मांडण्याचा प्रयत्न केला आहे. युडीसी वर्गीकरण पद्धती आजच्या अंकीय व संगणकीय युगातही सक्षम ठेवण्यासाठी केलेले प्रयत्न, उपयुक्तता याविषयी थोडक्यात चर्चा करून युनिव्हर्सल डेसिमल वर्गीकरण पद्धतीची थोडक्यात पण ऐतिहासिक मागोवा या लेखाद्वारे घेण्यात येत आहे.

## प्रस्तावना

ज्ञान व्यवस्थापन हे ग्रंथालयाचे प्रमुख कार्य आहे व यासाठी ज्ञान व्यवस्थापन पद्धतीची (KOS) निर्मिती सर्व प्रकारच्या ज्ञानाच्या माहितीचे व्यवस्थापन योग्य

प्रकारे करण्यासाठी निर्मित केल्या गेल्या. या पद्धतीत मुख्यत्वे करून वर्गीकरण पद्धती (ग्रंथाची/माहितीची/वस्तूंची सामान्य स्तरावर केलेली रचना) विषय शीर्षक निर्मिती (Subject Heading), अधिकृत निर्णयधारिका (Authority File), संज्ञा संबंधकोश (Thesaurus) Semantic Networks व Ontology, इत्यादीचा समावेश करून ज्ञानाचे तसेच माहितीचे व्यवस्थापन करणे सुलभ झाले व या पद्धतींचा वापर ग्रंथालयात जास्त प्रमाणात आढळून आला. याचे मुख्य कारण म्हणजे ग्रंथपालांना ग्रंथालयात उपर्जित केलेल्या ज्ञान संग्रहाचे व्यवस्थापन सुलभरितीने करता आले. थोडक्यात, ज्ञान व्यवस्थापन पद्धतीमुळे वाचकांच्या माहितीच्या गरजा व ग्रंथालयातील उपलब्ध असलेली माहिती संपदा याची सांगड घालणे ग्रंथपालांना शक्य झाले. अंकीय स्वरूपाच्या ग्रंथालयातसुद्धा ज्ञान व्यवस्थापन पद्धतीचा अवलंब केला जातो. ज्यामुळे वाचकांना/उपभोक्त्यांना ग्रंथसंग्रहाची माहिती देऊन तसेच माहिती शोधास मदत होते. यासर्व पद्धतीत ग्रंथालय वर्गीकरण पद्धती ज्ञान व व्यवस्थापनासाठी पारंपरिक काळापासून प्रज्वलित आहे. ग्रंथालय वर्गीकरणात विविध पद्धतीची निर्मिती व त्यांना अद्ययावत ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

## (२) ग्रंथालयाचे स्वरूप

ग्रंथालय व माहिती केंद्रे ही सद्य:स्थितीत ज्ञानाचे भांडार असून वाचकास हवे ते ज्ञान ग्रंथालयामार्फत ग्रंथातून व इतर साहित्यातून प्राप्त करता येते. ग्रंथालयातील ज्ञानसंग्रह हा मुद्रित तसेच अमुद्रित व अंकीय स्वरूपात असून तालिका, वर्गीकरण व निर्देश (Index) यांचा वापर वाचकास माहिती साधनांचे योग्य व्यवस्थापन करण्यासाठी या प्रक्रिया अत्यंत उपयुक्त ठरतात. ग्रंथालयातील माहिती साधनांचा वापर वर्गीकरण व तालिकीकरण पद्धतीचा कुशलतेने व गुणवत्तेने वापर करून ग्रंथांची व ग्रंथालयाची उपयुक्तता वाढवण्यास मदत होते. सद्य:स्थितीत माहिती तंत्रज्ञानाचा वापर ग्रंथालयात मोठ्या प्रमाणावर होत असल्याने ग्रंथालयातील कार्यपद्धती, कार्यप्रणाली, माहितीवरील प्रक्रिया व ग्रंथालयीन माहिती सेवा यामध्ये आमूलाग्र बदल दिसून येत आहे. पारंपरिक पद्धतीत ग्रंथ हे ग्रंथालयात दाखल होताच त्यावर वर्गीकरण, तालिकीकरण, सूचीकरण करून ग्रंथाची उपयुक्तता वृद्धिंगत करत त्याचप्रमाणे अंकीय ग्रंथालयात येणाऱ्या अंकीय प्रकाशनाचे योग्य प्रकारे तालिकीकरण, वर्गीकरण व ओळख क्रमांक (Identification Number) देणे आवश्यक आहे. ग्रंथालयातूनही अंकीय माहिती साधनांचा योग्य व सुलभ वापर होण्यास अंकीय माहितीवर प्रक्रिया होणे आवश्यक आहे. अंकीय माध्यमात हायपर लिंक (Hyperlink) सारख्या क्लृप्त्यांचा वापर

करून त्याची उपयुक्तता वाढण्यास मदत होत आहे. परंतु ज्ञान व्यवस्थापन पद्धतीतसुद्धा बदल होत आहेत. आधुनिक काळातील ग्रंथसंग्रहाशी समरस होण्यास वर्गीकरण पद्धतीचा पण वापर होत असल्याने याचे महत्त्व अद्यापही अबाधित आहे. युनिव्हर्सल डेसिमल पद्धतीतसुद्धा योग्य तो बदल करून त्यांचा वापर वृद्धिंगत केला आहे. या पद्धतीचे सखोल ऐतिहासिक अवलोकन होणे गरजेचे आहे.

## (३) ग्रंथालय वर्गीकरण व व्याख्या व उद्देश

वर्गीकरण हा शब्द लॅटिन ''क्लासी'' (Classi) या शब्दापासून वापरात आला. प्राचीन रोममध्ये 'क्लासी' ह्या शब्दाचा वापर ''एकाच वर्गातील समान गुणधर्म असलेल्या व्यक्तींचा समूह'' यासाठी संबोधला जात असे. सर्वसाधारणपणे वर्गीकरण म्हणजे विचार किंवा वस्तूसमूह यांच्या गुणधर्मानुसार गटात विभागणी करण्याची पद्धती होय. वर्गीकरणाची संकल्पना विविध तज्ज्ञांनी केलेल्या व्याख्यांतून स्पष्ट केली आहे. मार्गारेट मान (१९३०) यांच्या मते वर्गीकरण म्हणजे सारख्या व विभिन्न वस्तूंचे गट तयार करण्याची कृती होय. शास्त्रोक्त पद्धतीने वस्तूंचे उपयक्ततेनुसार केलेले संच यास वर्गीकरण असे संबोधले. बेरविक सेअर्स (१९६७) यांच्या मते 'ग्रंथाचे वर्गीकरण म्हणजे ग्रंथाची वाचकाच्या उपयुक्ततेनुसार कपाटांवर केलेली रचना होय. न्यू एनसायक्लोपिडिया ब्रिटानिकामध्ये केलेल्या व्याख्येनुसार ग्रंथालय वर्गीकरण ही पद्धत ग्रंथालयात वाचकांना सुलभतेने व सहजपणे ग्रंथ हाताळण्यासाठी केलेली प्रक्रिया होय. मात्टबी (१९७२)च्या मते ग्रंथ वर्गीकरण ही शास्त्रीय पद्धतीने केलेली ग्रंथांची व इतर साहित्याची कपाटांवर किंवा तालिकेत व सूचित केलेल्या नोंदी वाचकांसाठी व माहिती शोधण्यास उपयुक्त ठरतात. हंटर (२००२) यांच्या मते वर्गीकरण म्हणजे सारख्या गुणधर्माच्या वस्तूंचे गट पाडणे होय. यांच्या मते वर्गीकरण ही वैचारिक व बौद्धिक (Mental) प्रक्रिया आहे. ज्यात वस्तूंच्या सारखेपणाच्या गुणधर्मावर त्यांचे गट पाडले जातात व त्यांचा वर्ग स्पष्ट केला जातो. रंगनाथन (१९६७) यांनीसुद्धा वर्गीकरणांची प्रक्रिया विस्तृतपणे मांडली आहे व त्यांच्या मते वर्गीकरण म्हणजे ग्रंथाच्या विषयाचे रूपांतर सांकेतिक भाषेतून किंवा संख्या किंवा चिन्हांतून प्रकट करण्याची प्रक्रिया होय. यामुळे एकाच विषयावर आधारित ग्रंथातील घटकांना एकत्रित आणण्याची पद्धती होय. विकिपिडियामध्ये दिलेली व्याख्या ''ग्रंथ वर्गीकरण ही ग्रंथाची, प्रलेखांची विषयावर विभागणी व रचना करून ती सांकेतिक भाषेत निर्देशन करण्याची क्रिया होय.''

ह्या सर्व व्याख्यांवरून असे स्पष्ट होते की, ग्रंथालय वर्गीकरण ही शास्त्रोक्त पद्धतीने ग्रंथांची व इतर वाचन साहित्याची केलेली विषयावर रचना होय. ग्रंथ वर्गीकरणामुळे ग्रंथाची उपलब्धता, शोध व स्थानिश्चिती सहज व सुलभपणे करता येते. वर्गीकरणकारानुसार व इतर समीक्षकांनुसार वर्गीकरणाची उपयुक्तता ग्रंथाची विषयावर मांडणी होय. परंतु ग्रंथ वर्गीकरण हे ज्ञानाचे वर्गीकरण असून त्यात गरजेनुसार वारंवार फेरफार केले जातात. मानवी जीवनातही वर्गीकरणास अनन्य स्थान आहे व रोजच्या जीवनात मानव हा वर्गीकरणावर अवलंबून असतो.

## (४) वर्गीकरणाचे उद्देश

ग्रंथालय वर्गीकरणाचा मुख्य हेतू म्हणजे ग्रंथालयातील ग्रंथसंग्रहाची विषयावर रचना करून प्रत्येकाचे ग्रंथालयातील स्थान निश्चित करणे. ज्यामुळे वाचक विषयावरील पुस्तके हाताळू शकतो व तालिकेप्रमाणे ग्रंथ स्वत: मिळवू शकतो या व्यतिरिक्त खालील हेतूपण साध्य होतात.

- वाचकांची सोय व ग्रंथांची वर्गवर रचना यामुळे समान विषयावर आधारित ग्रंथ साहित्य एकाच वर्गात उपयुक्ततेसाठी एकत्रित करता येतात.
- ग्रंथ वापरून झाल्यावर पुन्हा योग्य जागी ठेवण्यास सुलभता येते.
- नवीन ग्रंथांसाठी जागा उपलब्ध करता येते.
- स्थूल व सूक्ष्म विषयांचे योग्य प्रकारे वर्गीकरण करून जागा निश्चित होते.
- विषयावर सूची तयार करण्यासाठी
- ग्रंथांची उपयुक्तता वाढण्यासाठी

## (५) वर्गीकरण पद्धतीचे प्रकार

ग्रंथालयीन वर्गीकरण पद्धतींचे त्यांच्या स्वरूपानुसार डॉ. रंगनाथन (१९६५) यांनी ग्रंथालय तीन कालखंडात विभागणी केली.

(१) पैलूबद्धता (n) पूर्व कालखंड - (१८७६ - १८९६)
(२) पैलूबद्धतेच्या रूपांतरचा कालखंड - (१८९७ - १९३२)
(३) पैलूबद्धतेचा कालखंड - (१९३३ - १९७२)

परंतु वर्गीकरण पद्धतीत १९७२ नंतरही बरेच बदल होत गेले व यास आपण पैलूबद्धता आणि पैलूबद्धते उपरांत कालखंड असे संबोधण्यास हरकत नाही. या नजीकच्या काळखंडात सर्व प्रमुख वर्गीकरण पद्धतीत विस्तृतपणा व

अंकीय वातावरणाशी जवळीक निर्माण करण्याचा प्रयत्न होत आहे. या काळखंडात संकणकीकृत वर्गीकरण पद्धती, ज्ञान व्यवस्थापन पद्धती (KOS) Theasurus, Taxonomies, Ontologies, इत्यादी संकल्पनांचा उदय झाला व ग्रंथालय वर्गीकरणाचाही यात मोठा वाटा ठरला आहे.

**५.१ पैलूबद्धता पूर्व वर्गीकरण पद्धती**

यामध्ये प्रामुख्याने खालील पद्धतींचा समावेश केला जातो.

- मेल्वूल डेवी यांची दशांश वर्गीकरण पद्धती (Melville Dewey's Decimal Classification)
- सी. ए. कटर यांची एक्सपान सिव्ह वर्गीकरण पद्धती (C. A. Cutters Expansive Classification System (1879)

**५.२ पैलूबद्धतेच्या रूपांतरित वर्गीकरण पद्धती**

यामध्ये खालील प्रमुख ग्रंथालय वर्गीकरण पद्धतींचा समावेश केला जातो.

- युनिव्हर्सल डेसीमल वर्गीकरण पद्धती (Universal Decimal Classification System (UDC) 1885, 1897)
- लायब्ररी ऑफ काँग्रेस वर्गीकरण पद्धती (Library of Congress Classification System (LCC) 1897, 1902)
- Brown's Subject Classification (1906 - 1939)

**५.३ पैलूबद्ध वर्गीकरण पद्धती**

- रंगनाथन यांची द्विबिंदू वर्गीकरण पद्धती [Ranganathan's Colon Classification System (1933)]
- ब्लीस यांची बिबलिओग्राफिक वर्गीकरण (Bliss Bibliographic Classification System (1933)
- लायब्ररी बिबलिओग्राफिक वर्गीकरण (Library Bibliographic Classification (1960)
- फॉरमोट रायडर्सची संटरनॅशनल वर्गीकरण (Fermont Riders International Classification (1961) पद्धती

विकीपिडीयात (http://en.wikipedia.org/wiki/library_classification) वर्गीकरण पद्धतीचे खालील तीन प्रकार सुचविले आहे.

(१) जागतिक वर्गीकरण पद्धती (Universal Classification Scheme)

(२) विशिष्ट वर्गीकरण पद्धती (Specific Classification Scheme)

(३) राष्ट्रीय वर्गीकरण पद्धती (National Classification Scheme)

- जागतिक वर्गीकरण (Universal Classification Scheme) पद्धतीमध्ये समाविष्ट केलेल्या प्रमुख पद्धती म्हणजे D.D.C., UDC. CC व LC.
- विशेष वर्गीकरण पद्धतीत एखाद्या विशिष्ट विषयास अनुसरून केलेली पद्धती उदा. ब्रिटिश कॅटलॉग ऑफ म्युसिअम वर्गीकरण पद्धती (British Catalogue of Museum Classification) डिकिसनस वर्गीकरण (Dickinson Classification) व नॅशनल लायब्ररी ऑफ मेडिसीन वर्गीकरण (NLM Classification, IPC), इत्यादीचा समावेश होतो तर
- राष्ट्रीय वर्गीकरण पद्धतीत विशिष्ट देशात निर्मित व वापरली जाणारी वर्गीकरण पद्धती उदा. स्विडिश ग्रंथालय वर्गीकरण (Swedish Library Classification)

या सर्व पद्धतीमध्ये DDC, UDC, LC व CC या ग्रंथ वर्गीकरण पद्धती खूपच प्रचलित आहेत व याचा वापर आजही बऱ्याच ग्रंथालयांतून होत आहे. UDC चा क्रम जगात दुसऱ्या क्रमांकावर आहे व या पद्धतीच्या गुणधर्मांमुळे ही पद्धती विशेष ग्रंथालयात वापरली जाते व सखोल वर्गीकरणासाठी ही पद्धती उपयुक्त आहे. वर्गीकरण पद्धतीचे प्रकार दर्शविताना काही अभ्यासकांनी विषयाच्या मांडणीच्या स्वरूपानुसार, त्यांचे वर्गीकरण पद्धतीमध्ये विश्लेषण केले आहे व त्यांचे तीन प्रकार केले आहेत. ते प्रकार पुढीलप्रमाणे आहे.

**(१) परिगणनात्मक (Enumerative) :** यात विषयांसाठी तयार वर्गांक दिलेले असतात. उदा. LCC, DDC

**(२) उतरंडदर्शक (Hierarchical) :** यात विषयांची विभागणी व रचना सामान्य विषयाकडून विशिष्ट विषयाकडे नेली जाते. उदा. DDC

**(३) पैलूबद्ध किंवा विश्लेषण संश्लेषणात्मक (Faceted or Analytico Synthetic) :** यात विषयाची पैलूंमध्ये (Facet) विभागणी केली जाते. हे

पैलू ते Mutually exclusive orthogonal प्रमाणे असतात. उदा. CC, BLISS, UDC

## (६) युनिव्हर्सल डेसिमल वर्गीकरण (UDC)

युनिव्हर्सल डेसिमल वर्गीकरण पद्धतीची निर्मिती ही दोन बेल्जीयन सूचीकार व वकील पॉल ऑटलेट व हेन्सी ला फोन्टेन यांनी एकोणीसाव्या शतकाच्या शेवटी केली. युडीसी ही पद्धती विविध नावांनी प्रसारित झाली. जसे युरोपियन डेवी (European Dewey) , ब्रुसेल्स वर्गीकरण (Brussels Classification), इंटरनॅशनल डेसिमल वर्गीकरण (International Decimal Classification), इत्यादी (Satija 2008), UDC ही वर्गीकरण पद्धती ड्युई यांच्या पद्धतीवर आधारित असल्याने यास विस्तारित ड्युई (Expanded Dewey) असे पण सुरूवातीस नोंदवले गेले.

परंतु, UDC ही सर्वात प्रथम आंतरराष्ट्रीय वर्गीकरण पद्धती म्हणून संबोधली गेली व याचा उपयोग प्रामुख्याने सूचित्मक नोंदीच्या वर्गीकरणासाठी व प्रलेखन कार्यासाठी (Documentation Work) करण्यात आला. तेव्हा पूर्वीच्या पद्धतीचा वापर हा फक्त ग्रंथालय वर्गीकरणासाठी व ग्रंथांची कपाटांवर रचना करण्यासाठी केला जाता होता, ही या पद्धतीची विशेषत: ठरली. माहिती शोधासाठीचे प्रमुख साधन तसेच सुलभ ग्रंथ वर्गीकरणास ही पद्धती उपयुक्त ठरली. ह्या पद्धतीच्या लवचिकतेमुळे (Flexibility) तसेच अनेक भाषेतून प्रकाशित झाल्याने याची व्याप्ती वाढत गेली. ज्ञानाच्या सर्व शाखा या वर्गीकरण पद्धतीने समाविष्ट केल्या असल्या तरी ही पद्धती विज्ञान व तंत्रज्ञानातील प्रलेखांच्या वर्गीकरणास खूप परिणामकारक पद्धती ठरली. Slavic (२००८) यांनी केलेल्या UDC च्या ग्रंथालयीन वापरासंबंधीच्या जागतिक सर्वेक्षणात असे दृष्टिपथात आले की, UDC वर्गीकरण पद्धती ही जगात वापरल्या जाणाऱ्या सर्व वर्गीकरण पद्धतीत दुसऱ्या क्रमांकावर आहे. सुस्पष्ट संज्ञा (Terms), संरचना (Structure), संज्ञांचा क्रम (Vocabulary Syntax), संश्लेषणात्मक निर्देशन भाषा (Synthetic Indexing Language), इत्यादींच्या वापरामुळे ही पद्धती माहिती शोधण्यासाठी उपयुक्त ठरली आहे.

थोडक्यात, UDC ही एक महत्त्वाची ग्रंथालय वर्गीकरण पद्धती म्हणून विविध ग्रंथालयांतून जागतिक स्तरावर वापरली गेली. सकृतदर्शनी ही पद्धती जरी DDC वर आधारण्यासारखी दिसून आली तरी विविध साहाय्यकारी तक्त्यांमुळे (Auxiliary Tables) (भाषा, स्थळ, काळ, चिन्हांकन, इत्यादी) ही पद्धती जास्त सक्षम ठरली व सखोल वर्गीकरणासाठी या पद्धतीचा वापर अनेक ग्रंथालयांतून झाला. या पद्धतीचा आढावा, आशय (Contents), रचना, उपयुक्तता, कार्यक्षमता, पोटेंशियल व आधुनिकता या संदर्भात उपयुक्त ठरेल.

**(७) UDC चे ऐतिहासिक अवलोकन**

१८९५च्या सुरूवातीस इंटरनॅशनल इन्स्टिटट्यूट ऑफ बिबलिओग्राफी (IIB) या संस्थेस जागतिक सूचिची (Universal Bibliography) रचना करण्यासाठी एका अशा पद्धतीची गरज भासली की ती पद्धती सूचीय नोंदीची वर्गीकृत रचना करण्यासाठी एका अशा पद्धतीची गरज भासली की ती पद्धती सूचीय नोंदीची वर्गीकृत रचना करण्यासाठी मदत करू शकेल. या कार्यासाठी दोन बेल्जियन सूचीकार पॉल ऑटलेट (१८६८-१९४४) व नोबेल पारितोषिक विजेता हेन्री या फोन्टेन (१८६४-१९४३) या यांनी मेल्विल डेवी (१८५१-१९३१) यांची परवानगी त्यांच्या DDC च्या वापरासंबंधी व नोंदीची रचना करण्यासाठी घेतली. अशाप्रकारे या दोघांनी सूक्ष्म प्रलेख वर्गीकरणासाठी विस्तृत वर्गीकरण पद्धती तयार करण्याची प्रक्रिया सुरू केली. प्रथम त्यांनी DDC मध्ये दिशा, सखोलता व लवचिकता निर्माण केली व पहिली पैलूबद्ध (Faceted Classification) वर्गीकरण तयार केले. (Satija 2008)

या दोन्ही सूचिकारांनी उत्सुकतेपोटी जगात छपाई यंत्राच्या उदयानंतर असलेल्या विषयांची समग्र सूची शास्त्रोक्त पद्धतीने संकलित करण्याचा चंग बांधलाव (रिपोर्टियर बिबलीआग्राफी युनिव्हर्सल) मानवी ज्ञानाच्या सर्व शाका समाविष्ट करण्याचा प्रयत्न केला. ऑटलेट व फोनटेन यांनी डेवी यांना भेटून DDC मध्ये संश्लेषण साधनांचा (Synthetic Device) व साहाय्यकारी तक्त्यांचा (Auxiliary Tables) चा वापर करून नवीन पैलूयुक्त संरचनेद्वारे (Faceted Structure) वर्गीकरण कसे सुलभ करता येईल याविषयी चर्च केली, अशा

रितीने युनिव्हर्सल डेसिमल वर्गीकरणाची (UDC) प्रथम सुधारित व विस्तृत एक नवीन विश्लेषण संश्लेषणशत्मक (Analytico Synthetic) वर्गीकरण पद्धतीची आवृत्ती १९०५-१९०७ मध्ये ''मॅन्युअल रिपोर्टियर बिबिलीओग्राफी युनिव्हर्सल'' (Manual du Repertoire Bibliographique Universale) या नावाने प्रकाशित झाली व यात ३३००० उपविभाग व ३८००० विषयांची सूची समाविष्ट करण्यात आली. ही आवृत्ती युरोपमध्ये विविध ग्रंथालयात वापरण्यात आली. या पद्धतीची दुसरी आवृत्ती फ्रेंच भाषेत "Classification Decemale Universselle" या नावाने १९२३ व १९३३ मध्ये प्रकाशित झाली व पुढे या आवृत्तीत बऱ्याच सुधारणासुद्धा करण्यात आल्या.

UDC ची प्रथम आवृत्ती ही DDC च्या पाचव्या आवृत्तीवर (१८९४) फ्रेंच भाषेत प्रथम प्रकाशित झाली. (१९०५-१९०७) व दुसरी आवृत्ती फ्रेंचमध्ये (१९२३-१९३३) या काळात प्रसिद्ध झाली. तिसरी व चौथी आवृत्ती अनुक्रमे जर्मन (१९३३) इंग्रजी (१९३६) भाषेत प्रकाशित झाल्या. (Satiji 2008, Mcllwaive 2010) साधारणत: १९३०मध्ये या वर्गीकरण पद्धतीचे रूपांतर जर्मन व इंग्रजी भाषेत करण्यास सुरूवात झाली. UDC वर्गीकरण पद्धतीच्या विकासासाठी व पद्धती नियमित अद्ययावत ठेवण्यासाठी या पद्धतीचे निर्माते ऑटलेट व फोन्टेन यांनी एक संस्था स्थापन करण्याचा विचार करून १९३१ मध्ये 'इंटरनॅशनल इन्स्टिटट्यूट ऑफ डॉक्यूमेंटेशन' (IID) ही संस्था स्थापन केली, या संस्थेचे मूळ नाव ''इन्स्टिटट्यूट इंटरनॅशनल डी बिबलीओग्राफी'' (IIB) किंवा ''ब्रुसेल्स इन्स्टिटट्यूट'' पण संबोधत होते. या संस्थेचेच रूपांतर दोघांनी IID मध्ये केले तसेच ही संस्था १९३७ मध्ये नेदरलँड, येथील डेव्हेंटर (Deventer) या शहरातून ''दि हेग'' या शहरी स्थलांतरीत केली व संस्थेचे नवीन नामांतर ''फेडरेशन इंटरनॅशनल डी डॉक्युमेंटेशन (FID) असे केले. फोन्टेन (१९४३) व ऑटलेट (१९४४) यांच्या निधनापश्चात (UDC) च्या प्रकाशनाची जबाबदारी ''डॉन्कर डूविस' (Donker Duyvis) यांनी घेऊन या वर्गीकरण पद्धतीवर नियंत्रण ठेवले, तसेच १९८० पासून या वर्गीकरणाच्या विविध विस्तृत आवृत्त्या विविध भाषेतून प्रकाशित होत गेल्या. सतिजा (२००८) यांनी UDC च्या विकासाचे पुढील चार टप्पे दर्शविले आहेत.

- १८९५-१९३३ फ्रेंच काळखंड. या काळामध्ये वर्गीकरण पद्धतीचा आरंभ व पायारावनी झाली.
- १९३३-१९५२ जर्मन काळखंड. या काळामध्ये विस्तृतता व सखोलता निर्माण झाली.
- १९३६-१९७५ इंग्रजी काळखंड. या काळात या पद्धतीवर संशोधन व वापर यावर भर देऊन सुधारित आवृत्त्या काढल्या.
- १९९० - आंतरराष्ट्रीय काळखंड. या काळात पद्धतीत तांत्रिक व संघटनात्मक सुधारणा केल्या.

व्यापकतेच्या दृष्टीने या वर्गीकरण पद्धतीच्या तीन आवृत्त्या प्रकाशित झाल्या आहेत.

(१) पूर्ण आवृत्ती (Full Edition)

(२) मध्यम आवृत्ती (Medium Edition)

(३) संक्षिप्त आवृत्ती (Abridged Edition)

याचप्रमाणे या वर्गीकरण पद्धतीच्या ''प्रमुख विषयवार'' (Subject Oriented) आवृत्यांचीपण निर्मिती केली गेली. Abridged Building Classification (ABC), UDC for Polar Librarires, Global Forest Decimal Classification ही त्यातील काही उदाहरणे होत. स्लाविक (२००४) यांना त्यांच्या सर्वेक्षणातून असे दिसून आले की, या वर्गीकरण पद्धतीच्या पूर्ण आवृत्तीत दोन लाखांहून अधिक विषयांच्या नोंदीची समाविष्टता आहे व साधारण १११ देशांतून या पद्धतीचा वापर नोंदवला गेला तसेच ३८ भाषेतूनही पद्धती प्रकाशित झाली.

सतिजा (२००८) यांच्या अवलोकनात ही १९९० पर्यंत पूर्ण आवृत्तीत दोन लाख नोंदी मध्यम आवृत्तीत साठ हजार नांदी व संक्षिप्त आवृत्तीत तीस हजार नोंदी उपलब्ध आहेत. याच वर्गीकरण पद्धतीची "Envlish Pocket" आवृत्ती पण BSI या संस्थेने प्रकाशनासाठी सुरुवात केली आहे. तसेच बहुभाषीय "Pocket Edition" चे प्रकाशन UDC कन्सोरशियमने हाती घेतले आहे. थोडक्यात, या पद्धतीची सुधारणा नेहमीच योग्य दिशेने होत गेली.

१९८० नंतर FID संस्थेने या "International Task Force" समितीची स्थापना करून या वर्गीकरण पद्धतीतील भविष्यातील बदल व प्रकाशनाविषयी मसुदा करण्याचे ठरविले व ही समिती १९९० पासून कार्यन्वित झाली. (गिलख्रिस्ट

१९९०) या समितीने काही सुधारणा मांडल्या. त्यातील महत्त्वाच्या सुधारणा म्हणजे -

- वर्गीकरण पद्धतीची अंकीय स्वरूपात ''मास्टर फाईल'' (Master File) तयार केली. ही फाईल संगणकाद्वारे वाचता तसेच वापरता येईल.
- Master File च्या प्रकाशनासाठी ''कन्सोर्सिशयम ऑफ पब्लिशर्स'' (Consortiums of Publishers) ची स्थापना करणे व यास "UDC" कन्सोर्सियम (UDC Consortium) (UDCC) संबोधण्यात यावे.
- या सर्वांचे व्यवस्थापन Executive Committee व Editor in Chief तसेच Editorial Board यांच्या मार्फत करावे.

१९४४ मध्ये या बाबींची पूर्तता करण्यास सुरूवात झाली व साधारण दहा वर्षाच्या काळखंडानंतर पुन्हा या वर्गीकरण पद्धतीत विस्तृतता, सखोलता, आधुनिकता अद्ययावत हे बदल घडवून आणण्याची प्रक्रिया सुरू झाली. साधारण २००० नंतर FID ही संस्था कन्सोसीशियमची सभासद म्हणून इतर प्रकाशकांसह घोषित झाली. अशा पद्धतीने ''दि हेग'' येथील व्यवस्थापन UDC चे निर्देशक (Director) यांच्या देखरेखीद्वारे सुरू झाले.

UDCC ही प्रकाशकांनी नॉन प्रॉफिट संस्था म्हणून UDC च्या नियंत्रणासाठी, विकासासाठी, आवृत्त्या प्रकाशित करून वितरणासाठी, संपादकीय गट स्थापने, Advisory Board नियुक्त करणे ही कार्ये करण्यासाठी स्थापना झाली.

१९९२-२००६ या कालावधीत UDC चा वापर माहिती स्त्रोतांचे संघटन करण्यासाठी केला गेला. त्याचप्रमाणे इंग्रजी इंटरफेजसह विषयाधारित माहिती शोध सुविधा (Subject Gateway) स्वयंचलित वर्गीकरण (Automatic Classification) इत्यादीसाठी पण वापर केला. Stoklasova (२००३) यांनी तसेच DESIRE (RE 1004) च्या रिपोर्टमध्ये या वर्गीकरण पद्धतीचा वापर इंटरनेट स्रोत व विषयाधारित माहिती शोध सुविधा (Subject Gateway) साठी कसा केला हे स्पष्ट केले आहे.

UDC वर्गीकरणाच्या अंकीय स्वरूपातील Master File (Machine Readable Maser File) ही UDC - Master Reference File (UDC-MRF) म्हणून'दि हेग' येथे संकलित करण्याचे काम सुरू झाले. यास "Extnesions and Corrections to UDE" असे संबोधण्यास आले व Master File ची

आवृत्ती ही मूळ इंग्रजी माध्यमातील आवृत्तीवर आधारित होती. (BS 1000 M : 1985) तसेच १९९२ पर्यंतच्या सुधारणांचा (Amendments) पण यात समावेश होता. या वर्गीकरणाच्या १९९२ नंतरच्या प्रकाशनात UDC-MRF आधारित नोंदीचा समावेश करण्यात आला. (फक्त इंग्रजी भाषेतील नोंदी MRF मध्ये उपलब्ध आहेत.) या आवृत्त्या CD-ROM व ऑनलाईन स्वरूपात, छापील (Print) आवृत्त्यांसह पण उपलब्ध झाल्या. UDC-MRF मध्ये ३१००० नोंदी जर्मनमध्ये उपलब्ध असून UDC कन्सोर्सियम २०१० पर्यंत जर्मन रूपांतर करण्याचा प्रकल्प घेतला. सुरूवातीस UDC-MRF माहितीसंच १९९३ मध्ये CDS/ISIS प्रणाली वापरून सुरू केला गेला.

### (८) UDC च्या विकासातील महत्त्वाचे टप्पे

| | |
|---|---|
| १९०५-०७ | प्रथम आवृत्ती १०००० वर्ग नोंदीसह फ्रेंच भाषेत प्रकाशन |
| १९२९ | IIB संस्था ब्रुसेल्स मधून 'दि हेग' येथे स्थलांतरित |
| १९३१ | IIB चे नामकरण IID - International Institute for Documentation मध्ये झाले. |
| १९२७-१९३३ | दुसरी फ्रेंच आवृत्ती Classification Decimale Universelle |
| १९३४-१९५३ | जर्मन आवृत्ती Dezimal - Classification |
| १९३७ | IID चे नामांतर FID (International Federeation for Documentation) मध्ये झाले. |
| १९६० | UDC वर्गीकरण पद्धतीचा प्रथम Online वापर. |
| १९८० | वर्गीकरण पद्धतीतील ६०,००० वर्ग नोंदी (मॅग्नेटिक टेप) चुंबकीय फितीवर "BSI - मध्ये प्रकाशित. |
| १९८० | International Task Force समितीची स्थापना |
| १९८० | वर्गीकरण पद्धतीच्या पूर्ण आवृत्त्या निघाल्या व त्यात दोन लाक वर्ग नोंदी समाविष्ट केल्या. |
| १९९२ | UDc ची ना नफा ना तोटा या तत्त्वावर प्रकाशकांच्या संस्थेस सुपूर्द केली व ही संस्था सभासद शुल्क, लायसेन्स, विक्री, इत्यादीवर नियंत्रण ठेवते. |
| १९९२-२००६ | UDC चा वापर इंटरनेट, Subject Gateway माहिती संच, इत्यादीमध्ये वापर केला. |

| | |
|---|---|
| १९९३ | UDC-MRF ची निर्मिती |
| २००१ | "UDC on Web" आवृत्ती उपलब्ध |
| २००७ | UDC-MRF मध्ये ६७६००० वर्गाची नोंद सुधारित आवृत्तीत वर्ग केली. |

(Source : UDC Online : UDC on web at http://www.udconline.net)

**(९) UDC ची रचना**

UDC ची रचना ही लवचिक असल्याने यामध्ये वारंवार परिवर्तन करून नवीन विषयांना सामावून घेण्याची सुविधा प्राप्त झाली आहे. UDC पद्धतीचे संशोधनात्मक व छाप पाडणारे वैशिष्ट्य साधे विषय दर्शविण्याबरोबर विविध विषयांतील संबंध दर्शविण्याचे कार्यसुद्धा करते. या वैशिष्ट्यामुळे ही पद्धती उतरंड दर्शक (Hierarchical Structure) मध्ये समाविष्ट होऊन ज्ञानाच्या विभागणीसाठी/वर्गीकरणासाठी दहा मुख्य वर्गांची व प्रत्येक वर्गात उपविभाकाची सोय करून विषय व्याप्ती वाढविली आहे. लवचिकतेमुळे या पद्धतीत वारंवार रचना, क्रमातील स्तर (Hierarchical Levels) उपयुक्ततेनुसार बदल व अद्ययावतपणा ह्यामुळे ह्या पद्धतीचा वापर वाढतच राहीला.

UDC च्या सुरूवातीपासूनच्या रचनेविषयीचा आढावा घेतल्यास पुढील ठळक वैशिष्ट्ये लक्षात येतात.

या वर्गीकरणाची रूपरेषा व मुख्य वर्गांक हे फक्त एका मूळ अंकावर १आधारित आहेत.

0 - Generalities
1 - Philosophy
2 - Religion
3 - Social Sciences
4 - Vacant (१९६० पासून व तेव्हापासून वापरात नाही)
5 - Mathematics and Natural Sciences
6 - Applied Sciences
7 - Fine Arts
8 - Languages and Literature
9 - Geography / Biography

वरील एक अंकीय मुख्य दहा वर्ग तयार केले. (वर्ग ४ हा १९६० पासून रिक्त ठेवला आहे.)

- या पद्धतीत अरेबिक अंक व चिन्हांकनाचा तसेच साहाय्यकारी तक्त्यांचा (Auxiliary Tables) वापर करून ही पद्धती सखोल वर्गीकरणासाठी उपयुक्त ठरली आहे.
- ही पद्धती सर्व स्तरांवरील व विषयावरील ग्रंथालयासाठी उपयुक्त तर आहेच, परंतु विशेष ग्रंथालयासाठी याची उपयुक्तता अधिक आहे.
- सूचित्मक नोंदीच्या (Bibliographic) वर्गीकरण पद्धतीत शेड्यूल्स, नोटेशनस व सूची ही मुख्य घटक आहेत. त्याचप्रमाणे परिगणनात्मक (enumerative) व पैलूबद्ध (faceted) ही दोन वैशिष्टेपण दिसून येतात.
- UDC वापर कपाटावरील रचनेव्यतिरिक्त सूचीकरण व माहिती शोधण्यास जास्त होतो.
- या पद्धतीत स्मरण सुलभता, चिन्हांकाने याचा वापर करून विविध विषयांच्या संबंधाची जोड निर्माण केली आहे.
- चिन्हांकनाची उपयुक्तता व त्याचा वापर विषयातील विविध स्तर जोडण्यासाठी करून मूळ वर्गांचे विस्तार करणे सहज शक्य झाले.
- अतिरिक्त घटकांची नोंद करण्यास साहाय्यकारी तक्त्यांची मदत होते व यामुळे विषय आधारित स्थळ, काळ यांना दर्शविण्याची संधी मिळते.
- साहाय्यकारी तक्त्यांचे दोन प्रकार आहेत ते म्हणजे सामान्य व विशेष साहाय्यकारी तक्ते.
- या वर्गीकरणामुळे विषय विश्लेषण व सूक्ष्म वर्गीकरणावर जास्त प्रभाव पडतो.
- सर्व प्रकारच्या क्लृप्त्या वापरल्याने UDC ही बहुपैलूत्मक (Multidimensional) झाली आहे.

## (१०) UDC वर्गीकरण पद्धतीची उपयुक्तता व फायदे

UDC ची मुख्य उपयुक्तता पुस्तकांची, ग्रंथाची स्थाननिश्चिती, माहितीचा प्रतिशोध, वर्गीकृत तालिकेची निर्मिती, ग्रंथसंग्रह विकास, सूची निर्मिती, माहितीसंच निर्मिती, मेटा डाटा, इत्यादीसाठी दिसून येते. UDC वर्गीकरण पद्धतीत विविध क्लृप्त्या (Devices) वापरल्याने या पद्धतीत लवचिकता (Flexibility) आली आहे. त्यामुळे सखोल वर्गीकरण करणे तसेच नवीन वर्ग समाविष्ट करणे शक्य आहे. UDC ही खऱ्या अर्थाने विश्लेषण संश्लेषणात्मक (analytic-synthetic) वर्गीकरण पद्धती म्हणून प्रथमच विकसित केली आहे.

(Mcllwaire 1997, 2010) व यामुळे कोणतीही संकल्पना दुसऱ्या संकल्पनेशी जोडणे शक्य होते. १९८० पासून विकसित व सुधारित केलेले सर्व वर्ग हे पूर्ण पैलूयुक्त (Faceted) आहेत. यामुळे क्लिष्ट व मिश्र विषयांचे वर्गीकरण योग्य रितीने करता येते.

**१०.१ संगणकीकरण व UDC पद्धती**

UDC ची माहिती तंत्रज्ञानाचा वापर करून माहितीची प्रतीप्राप्ती करणे शक्य झाले. Rigby (1981) यांनी सादर केलेल्या अहवालात या पद्धतीचा सुधारणा, संशोधन व संगणकीकरणाबाबत (KWIC - KEy Word in Context) सूचीकरण ते संगणकीकरण व वर्गीकृत तालिका निर्मितीचा प्रवाह नोंदला आहे व ही पद्धती आणि तंत्रज्ञानाच्या सहाय्याने माहितीचा शोध व प्रतीप्राप्ती करण्यास सुलभ आहे हे दर्शविले आहे. विषयांची व संकल्पनांची उतरती क्रमवार (Hierarchical Structure) रचना माहिती शोधास कशी पूरक आहे हे विविध बाबींसह स्पष्ट केले आहे. UDC पद्धतीचा वापर करून ''मशीन रिट्रीव्हल'' प्रकल्प सर्वांत प्रथम १९६७-१९६८ मध्ये फ्रिमन व अर्थटन यांनी अमेरिकन इन्स्टिटट्यूट ऑफ फिजिक्स येथे "Automatic Direct Access to Information with Online UDC System - AUDACIOUS घेतला. या प्रकल्पांमुळे न्युक्लीयर सायन्स अबस्ट्रक्टमधील नोंदी वर्गीकृत पद्धतीने मांडता आल्या. इंटरनेटवरील विविध प्रकल्पांत जसे - DESIRE, NORDIC, SCORPION व CORC मधून युडीसीमुळे माहिती शोधनप्रक्रिया उपयुक्त ठरली. इंटरनेटवरील माहिती स्रोताचे स्वयंचलित पद्धतीने वर्गीकरण (Automatic Classification) करण्यासाठी UDC चा वापर करून SOSIG, NISS हे माहितीचे प्रवेशद्वार तयार केले. त्याचप्रमाणे INTUTE, HERO - Higher Education & Research Opportunities हे प्रकल्प आले. UDC चा वापर करून सुक्ष्म व स्थूल नोंदीचे वर्गीकरण करून अधिकृत नोंदीची सारणी (Authority Files) निर्माण केली. GERHARD - German Harvest automated Retrieval & Directory हा प्रकल्प पण UDC चा वापर करून तयार झाला. (Mcllwaire, 2010)

## १०.२ इंटरनेट व UDC

UDC चा वापर फक्त ग्रंथ वर्गीकरणापर्यंत सीमित न राहता ते इंटरनेटवर उपलब्ध असलेली माहिती स्रोतांचे स्वयंचलित वर्गीकरण (Automatic) करण्यासाठीसुद्धा झाले. सध्या इंटरनेट सेवा देणाऱ्या BUBL GERHARD, NISS, OMNI, SOSIG, इत्यादी यंत्रणेत युडीसीचा वापर करतात. इंटरनेटवरील माहिती स्रोतांच्या सेवेसाठी व वापरासाठी UDC पद्धती उपयुक्त ठरण्याचे कारण म्हणजे (DESIRERE, 1004)

- ह्या पद्धतीचा वापर सर्वत्र जागतिक मानके (Standard) म्हणून केला जातो.
- लवचिकता व नवीन विषय व संकल्पना समाविष्ट करण्याची सोय.
- वापरण्यास सुलभ, तसेच सखोलता
- अंकीय आवृत्तीची उपलब्धता
- इंटरनेट सेवामध्ये वापर करून SOSIG, NISS सारखे प्रकल्प निर्मिती यामुळे या पद्धतीचा वापर नवीन प्रकल्पास सोयीचा झाला.
- माहिती शोध शक्तिशाली व सुलभ
- नवीन विषयांसाठी वर्गांक तयार करण्याची क्षमताक

## १०.३ इतर काही उपयुक्तता व फायदे

UDC पद्धतीचे फायदे सर्व ग्रंथालयात ग्रंथ वर्गीकरण, सूचिकरण, विषय नोंदी करणे, मेटाडाटासाठी केला जातो. याची व्याप्ती व फायदे पुढीलप्रमाणे सांगता येतील.

- जगातील १३० देशांत १,५०,००० पेक्षा जास्त ग्रंथालयात ह्या पद्धतीचा वापर होतो.
- राष्ट्रीय सूचि निर्मितीसाठी ३० देशांत वापर
- माहिती संच निर्मितीत सहभाग NEBIS (2.6 Mission नोंदी), COBIS.SI (3.5 Mission नोंदी), VINITI RAS (28 Mission नोंदी), PROBASE (1.5 Mission नोंदी)
- पारंपरिक ग्रंथ वर्गीकरणासह इंटरनेटवरील (www) माहिती स्रोते शोधणे व वर्गीकृत करणे.
- वर्गीकृत विषय सूची, तालिका, माहितीसंच, माहितीशोध, माहितीसेवेत उपयुक्तता

- माहितीशोध सामान्य विषय, विस्तृत विषय, इत्यादीसह शक्य.
- Ontology व thesaurus च्या निर्मितीसाठी उपयुक्त
- सूक्ष्म विषयांचा योग्य प्रमाणात वापर करण्यास मदत
- माहिती शोधाची दर्जेदार क्षमता वाढवणे, Improved recall सहज शक्य
- माहिती संचातून विषयवार माहिती शोधण्यास मदत
- नियमित पद्धती अद्ययावतेमुळे पद्धती कालबाह्य होत नाही.
- संगणकीकृत तालिकेत सहज व सुलभ वापर शक्य
- सखोल वर्गीकरणासाठी अत्यंत उपयुक्त
- विविध स्तरांचा वापर करून सुलभता साधणे शक्य
- प्रमाणित (Standardize) पद्धती व विविध वर्णांची (Categories) स्पष्टता
- इंटरनेटच्या वापरात, मेटाडाटा व ''विषय गेटवे'' तयार करताना उपयुक्त
- बहुपैलूयुक्त वर्गांक (Multifacted)
- पद्धतीचा योग्य वापर होण्यास मार्गदर्शिका, विविध भाषेत प्रकाशित केल्या जसे "The UDC : A guide to its use."

या उपयुक्तेमुळे UDC चे मुख्य उपभोक्ते ग्रंथालय व माहिती केंद्रातील सेवक, ग्रंथालय, प्रलेखक, सूचीकार या सर्वांना माहिती/ज्ञानाचे वर्गीकरण करणे व ज्ञानाच्या विविध पैलूची शोध प्रक्रिया सुलभतेने करणे शक्य झाले.

## (११) सारांश

UDC ही सर्व वर्गीकरण पद्धतीतील जुनी व सामान्य पद्धती म्हणून विकसन पावली व संगणकीकृत माहितीचा शोध घेण्यासाठी कालांतराने ही पद्धती उपयुक्त व सक्षम ठरली. २००३ मध्ये उपयुक्त असे अकरा विविध प्रकारचे पैलू संबंध IPhase Relations) या पद्धतीत समाविष्ट केल्याने या पद्धतीची उपयुक्तता अजून वाढली. या वर्गीकरण पद्धतीचा वापर इंटरनेटसाठी करून बरीच संशोधन प्रकल्प तयार केली. उदा. DESIRE, NORDIC, SCORPION, CORC यामुळे ह्या वर्गीकरण पद्धतीची आधुनिक काळातील गरज व उपयुक्तता सिद्ध झाली व माहिती शोधन कार्य सुलभ झाले. इंटरनेट साहित्यात स्वयं-निर्मित वाढीच्या नियंत्रणासाठी वर्गांक पद्धतीची गरज भासत आहे. कारण कोणीही पारंपरिक (Manual) वर्गीकरण पद्धती यावर नियंत्रण ठेवण्यास असमर्थ आहे. परंतु UDCच्या वापराने बऱ्याच वर्गीकृत सेवा उदा.

SOIG, NISS माहिती गेटवे निर्माण केल्या. (Mcllwaine 2010) दुसरा मुख्य प्रकल्प UDCचा वापर करून केलेला GERHARD - (German Harvest Automated Retrieval & Dictionary) (http://www.gerhard.de/) हा वेब पेजेसचे स्वयंचलित (Automatic) वर्गीकरणाचे उदाहरण आहे व वर्गीकरण पद्धती ही माहिती शोधन पद्धतीचा आधारस्तंभ आहे हे सिद्ध करून दिले आहे. UDC पद्धती ही पारंपरिक वापरासाठी उपयुक्त तर आहेच, परंतु या पद्धतीचा वापर संगणकीय जाळ्यांच्या जगातसुद्धा योग्य रितीने करता येते हे विविध अभ्यासकांनी पटवून दिले आहे. ही पद्धती आजच्या जगात उपयुक्त वर्गीकरण पद्धती म्हणून वापरली जात आहे. UDC-MRF ची उपयुक्तता अंकीय युगात महत्त्वाचीही ठरत आहे.

## संदर्भ सूची


(1) Brewick Sayers, W. C. (1967), A manual of classification for librarians, London, Grafton & Co.

(2) BS 1000c (1963), Guide to Universal Decimal classification, UDC, (FID No. 345), BSI, London.

(3) DESIRE (RE 1004), The role of Classification Schemes in Internet resources description and discovery, Accessed at http:/www.ukoln.ac.uk/metadata/desire/classification/class_1. htm, accessed on 24 May, 2013.

(4) Gilchrist, A and Strachan D. eds. (1990) Essays for a new Decade, ASLIB, London.

(5) Hunter, E. (2002) Do we still need classification : future of classification, Grower, P.1-17.

(6) Library classification : Accessed at - http://en.wikipedia.org/wiki/library_classification accessed on 25.7.13

(7) Maltby, A (1972), classification in 1970s : A discussion of development and prospects for the major schemes, London, Bingley.

(8) Mann, Margaret (1930), Introduction to Cataloguing and classification of Books, 2nd ed. Chicago, Amercian Library Association.

(9) MciLwaine, C (1997) : The UDC : Some factors concerning its origin, Developments and influence. Journal of the Amercian Society for Information Science 48(4) 331-339.

(10) MciLwaine, I. C. (2009, 2010) Universal Decimal classification (UDC) In encyclopedia of Library and Information Sciences. Third edition Taylor and Francis, NY Vol. 1.1, PP3432-5439. accessed at http://2xdio.org/10.1081/E-ELIS3-12004352, Accessed on 13 May, 2013

(11) Ranganathan, S. R. (1965), Library classification through a century, Library Science with slant to Documentation, 2(1)1-30.

(12) Ranganathan, S. R. (1967), Colon classification 7 The edition, Edited by Gopinath, M. A. Bangalore, Sarada Ranganathan Endowment for Library Sciences.

(13) Ranganathan, S. R. (1967), Proelgomena to library classification. 3rd ed. Bangalore, Sarada Ranganathan Endownment for Library Science.

(14) Rigby, M. (1981), Automation and UDC. (FID 565), FID, The Hague.

(15) Satiji, M. P. (2008), Universal Decimal classification : Past and present DESIDOC Journal of Library and Information Technology vol. 28, 6 Nov. 2008 PP. 3-10

(16) Slavic, A (2004) UDC translations : A2004 survey report and bibliography, UDC, 26, pp. 58-80

(17) Slavic, A and Other (2008) Maintenance of Univedrsal Decimal classification : an overview of past and preparation for the future. Accessed at http://hdl.handle.net/10150/105220, accessed on 2 Feb. 2013

(18) Salvic, A (2008) Use of the Universal Decimal classification: a worldwide survey. Journal of Documentation, (64(2) PP211-2328, Accessed at http://dlist.siv.orizona.edu/1555/, accessed on 23rd April 2013.

(19) Stoklasova, B (2003) Short survey of subject gateways (SG) activity. IFLA 69th General conference and Council. World Library and Information Congress 1-9 Aug. 2003, Berlin

(20) UDC online : UDC on webs. Accessed at http://www.undconline.net

# ग्रंथालयात कुशल मानव संसाधनांची गरज

## ( Need of Skilled Human Resources in Library)

**श्री. हितेश गोपाल ब्रिजवासी**
ग्रंथपाल,
श्रीमती शरदचंद्रिका सुरेश पाटील कॉलेज ऑफ फार्मसी
ता. चोपडा, जि. जळगाव
Saihits1777gmail.com

*तंत्रज्ञानाच्या वाढत्या वापरामुळे अनेक क्षेत्रांच्या कार्यपद्धतीत आणि स्वरूपात बदल झालेला आहे. ग्रंथालयातही तंत्रज्ञानाचा वापर फार मोठ्या प्रमाणात होऊ लागल्याने ग्रंथालयाद्वारे दिल्या जाणाऱ्या सेवा आणि सुविधा यांच्यातसुद्धा बदल झालेला आपणास लक्षात येईल. ग्रंथालयाच्या मूळ स्वरूपात आणि पारंपरिक कार्यपद्धतीतसुद्धा बदल झालेले आहेत. आता ग्रंथालयासाठी उपलब्ध असलेल्या आज्ञावलींद्वारे **OPAC** सारख्या सुविधा दिल्या जातात, जेणेकरून जुन्या पद्धतीचे कॅटलॉग, इंडेक्स, सूची इत्यादी तयार करण्याची गरज भासत नाही. अशा सेवा संगणकीकृत झालेल्या दिसतात. याचप्रकारे ग्रंथालयात येणाऱ्या वाचकांच्या माहितीच्या गरजा आणि मागणी यासुद्धा वेगवेगळ्या आणि तंत्रज्ञानाधारित झालेल्या दिसतात. उदा. इंटरनेट. ई-बुक्स, ई-जर्नल्स, डेटाबेस, सी.डी / डि.व्ही. डी, इत्यादी. या सर्व गरजा आणि सुविधा पुरविण्यासाठी ग्रंथालयातील मानव संसाधनांना तंत्रज्ञानाची माहिती आणि ज्ञान असणे आवश्यक असून त्यांना हाताळण्याची कला आणि कुशलता त्यांच्या अंगी असणे आवश्यक झाले आहे. सदर लेखात ग्रंथालयांत कुशल मानव संसाधनाची गरज, फायदे आणि कुशल मानव संसाधनांची तंत्रे याचाच अभ्यास करण्यात आलेला आहे.*

## प्रस्तावना

ग्रंथालयाची ग्रंथसंपन्नता ही ज्याप्रमाणे महत्त्वाची असते त्याचप्रमाणे ग्रंथालयाच्या सेवा आणि सुविधा यासुद्धा तितक्याच महत्त्वाच्या असतात. ग्रंथालय हे एक ज्ञानकेंद्र तर आहेच, परंतु त्याचप्रमाणे ग्रंथालय हे एक माहितीचे सेवा केंद्रसुद्धा आहे. जेथे उपभोक्त्यांना ज्ञान किंवा माहिती प्राप्तीसाठी आवश्यक असणाऱ्या सेवा आणि

सुविधा पुरविण्यात येतात. आज वाढत्या तंत्रज्ञानाच्या वापरामुळे या सेवा आणि सुविधा देण्यासाठी कुशल मानव संसाधनांची गरज आहे. ग्रंथालयातील कर्मचाऱ्यांना संगणकाचा वापर, इंटरनेट हाताळणे, नवीन तंत्रज्ञानाची आणि उपकरणांची माहिती असणे आवश्यक आहे. यासाठी ग्रंथालयातील कर्मचारी निवडताना या सर्व बाबींचा विचार करणे किंवा जे कर्मचारी कार्यरत असतील त्यांना या कामाचे प्रशिक्षण देणे गरजेचे झाले आहे. जेणेकरून ते त्यांच्या कामात कुशल आणि तज्ज्ञ होऊ शकतील व उपभोक्त्यांना चांगल्या प्रकारची सेवा आणि सुविधा देता येतील व ग्रंथालयाची उपयोगिता अजून जास्त वाढवता येईल. ग्रंथालयांत येणारा प्रत्येक उपभोक्ता हा या तंत्रज्ञानाशी अवगत असेलच असे नाही. अशा उपभोक्त्यास ग्रंथालयाच्या वतीने माहिती शोधून देता आली पाहिजे व त्यांच्या माहितीच्या गरजा या पूर्ण करता आल्या पाहिजे. यासाठी ग्रंथालयातील मनुष्यबळाच्या अंगी योग्य कुशलता असणे गरजेचे आहे. ग्रंथालयाच्या विविध सेवा उदा. संदर्भसेवा, निवडक माहिती सेवा, प्रचलित माहिती सेवा या फार आवश्यक आणि महत्त्वाच्या सेवा आहेत. यांद्वारे उपभोक्त्यांच्या माहितीच्या गरजा पूर्ण तर होताच परंतु त्यांचा वेळ, पैसा आणि शारिरीक श्रम हेसुद्धा वाचते. आज अनेक सोशल नेटवर्किंग साईट्स आहेत ज्याद्वारे खूप सहज माहितीचे आदान प्रदान करता येते. निवडक माहिती सेवा देतानासुद्धा या तंत्रज्ञानाचा जास्तीतजास्त वापर करता येणेसुद्धा शक्य झाले आहे. Mobile Apps, Web Portal, Twitter, Blogs, Facebook आणि E-mails, Instant Messaging Service यांद्वारेसुद्धा खूप मोठ्या प्रमाणावर ग्रंथालय आपली सेवा आणि सुविधा वाढवू शकते, जेणेकरून उपभोक्त्यांना जास्तीतजास्त फायदा होईल, परंतु या सर्व सेवा आणि सुविधा देण्यासाठी ग्रंथालयात कुशल मानव संसाधनांची गरज जास्त प्रमाणात जाणवते. आज ग्रंथालयाच्या दैनंदिन कामासाठीसुद्धा संगणकाचा वापर फार मोठ्या प्रमाणात होताना दिसतो. ग्रंथालय व्यवस्थापनापासून तर ग्रंथ शोधण्यापर्यंत आज तंत्रज्ञानाचा वापर खूप मोठ्या प्रमाणात वापर होतो. या सर्व घटकांमुळे ग्रंथालयांनी आधुनिक ज्ञानकेंद्राकडे वाटचाल करणे सुरूदेखील केले आहे. ग्रंथालयाचे हे बदलते स्वरूप लक्षात घेता ग्रंथालयाच्या नावातसुद्धा बदल झालेला आपणास दिसून येतो. आता काही ठिकाणी ग्रंथालयांना Knowledge Resource Centre (KRC)असे नाव दिलेले आढळते. याचेच काही उदाहरण द्यायचे म्हटले तर CSIR चे National Chemical Laboratory द्वारे CSIR-NCL KRC (Knowledge Resource Centre) असे नाव ग्रंथालयांस देण्यात आले आहे, तसेच Knowledge Resource Centre, Indian Institute of

Plantation Management, Knowledge Resource Centre(Library) - GITAM University, Knowledge Resource Centre- Library Central Drug Research Institute इत्यादी ठिकाणीसुद्धा असाच बदल झालेला आपणास दिसतो, तसेच ग्रंथपाल या पदाच्या नावातसुद्धा बदल होऊ घातले आहे. परंतु ग्रंथालयाची ही वाटचाल कुशल मानव संसाधनांव्यतिरिक्त शक्य नाही, हेही तितकेच सत्य आहे.

### मानव संसाधन म्हणजे काय?

कोणत्याही क्षेत्रात कार्य करणाऱ्या मनुष्यबळास किंवा तेथील कर्मचाऱ्यांस मानव संसाधन असे म्हटले जाते. मनुष्यबळ व कर्मचारी हे ज्या क्षेत्रात कार्यरत आहे त्या क्षेत्रातील कामात प्रावीण्य, नवनवीन तंत्रज्ञानाची माहिती आणि त्यांना हाताळता येण्याची कला हे ज्याच्या अंगी असते त्या मानव संसाधनास कुशल मानव संसाधन असे म्हटले जाते. कोणत्याही क्षेत्राचा विकास आणि फायदा हा त्यांच्या मानव संसाधनावरच निर्धारित असतो. कामाची योग्यता, गुणवत्ता आणि दर्जा इत्यादींसाठीसुद्धा मानव संसाधन हे फार पहत्त्वाचे आहे. आज मोठमोठ्या सेवा पुरविणाऱ्या कंपन्यासुद्धा मानव संसाधनावर जास्त पैसा खर्च करताना दिसतात व त्यातून चांगला व्यवसायात चांगला फायदा करून घेतात. ग्रंथालयातसुद्धा व्यावसायिक कर्मचारी म्हणजे ग्रंथपाल, सहा-ग्रंथपाल, तांत्रिक-ग्रंथपाल यांच्यासमवेत जे काही कर्मचारी असतील त्यांना ग्रंथालय चालविण्यापासून तर सेवा आणि सुविधा देण्यापर्यंतच्या नवनवीन तंत्रज्ञानाची माहिती असणे आणि त्या तंत्रज्ञानाला हाताळता आले पाहिजे. तरच उपभोक्त्यांना ग्रंथालयाद्वारे चांगल्या प्रकारच्या सेवा आणि सुविधा देता येतील.

### कुशल मानव संसाधनांची गरज

(१) **ग्रंथालयातील व्यवस्थापनासाठी :** आज ग्रंथालयातील व्यवस्थापनाची अनेक कामे ही आज्ञावलीच्या मदतीने केली जातात. यामुळे ग्रंथालयांतील मनुष्यबळास या आज्ञावलीचे संपूर्ण ज्ञान असणे आवश्यक आहे. त्यासाठी त्याला योग्य प्रशिक्षण देऊन कुशल केले गेले पाहिजे जेणेकरून ते या आज्ञावलीचा योग्य वापर करून चांगल्या प्रकारे ग्रंथालय व्यवस्थापनाची विविध कार्ये करू शकतील.

(२) **ग्रंथालयाच्या दैनंदिन कामाच्या गुणवत्तेसाठी :** ग्रंथालयाची दैनंदिन कामे उदा. ग्रंथ आणि ग्रंथेतर साहित्याचे देवाण-घेवाण, कार्यालयीन पत्रव्यवहार,

आर्थिक व्यवहार इत्यादी काही ठराविक परंतु अत्यंत महत्त्वाची कामे ही संगणकाच्या किंवा ग्रंथालयीन प्रणालीचा वापर करून केली जातात. ही कामे उपभोक्त्यांशी आणि ग्रंथालयाच्या व्यवहारांशी निगडित असणारी कामे आहेत, त्यामुळे या कामांत व्यवस्थितपणा आणि अचूकता असणे गरचेची आहे. त्यामुळे ही कामे करण्यासाठी कुशल आणि प्रशिक्षित मानव संसाधनांची गरज भासते.

(३) **अद्ययावत सेवा आणि सुविधा देण्यासाठी :** सध्या अनेक तंत्रज्ञानाचा वापर हा माहिती शोधण्यासाठी केला जातो. संगणकाच्या आणि इंटरनेटच्या वाढत्या वापरामुळे अनेक नवनवीन तंत्राने माहिती शोधली जाते. उदा. Database, E-Journals, Audio-Videos Sites and Wiki's, etc. या तंत्रामुळे उपभोक्त्यांच्या माहिती शोध वर्तनात फार मोठा बदल झालेला आहे. यामुळे जर कुशल मानव संसाधन ग्रंथालयांकडे असतील तर बदलांचा वापर करून उपभोक्त्यांना चांगल्या ग्रंथालयीन सेवा आणि सुविधा देता येणे शक्य आहे.

(४) **डेटाबेस व्यवस्थापनासाठी :** आज ग्रंथालय आपल्या उपभोक्त्यांसाठी हे अधिकाधिक वाचनसाहित्य उपलब्ध करून देण्याच्या प्रयत्नात दिसतात, जेणेकरून उपभोक्त्यांच्या माहितीच्या गरजा या जास्तीतजास्त प्रमाणात पूर्ण करता येतील. अशा विविध डेटाबेसची सभासदत्व घेणे, त्यांच्यावर उपलब्ध असणाऱ्या विविध ई-जर्नल्सची माहिती ही उपभोक्त्यांना उपलब्ध करून देणे व त्यांचे योग्य व्यवस्थापन करणे यासाठीसुद्धा कुशल मानव संसाधनाची गरज भासते.

(५) **ग्रंथेतर साहित्यांच्या व्यवस्थापनासाठी :** ग्रंथालयांत फक्त ग्रंथांप्रमाणेच ग्रंथेतर ज्ञान साहित्यसुद्धा उपलब्ध असतात उदा. ई-बुक्स, ई-जर्नल्स, सी.डी. / डी.व्ही.डी, डेटाबेस, नकाशे, पृथ्वीगोल इत्यादी या साधनांद्वारे माहिती प्राप्त करणे हे ग्रंथ उघडून वाचन करणे इतपत सोपे नसते. यांच्या वापरासाठी विशिष्ट प्रशिक्षणाची गरज भासते जेणेकरुन याद्वारे मिळणारी माहिती ही अचूक आणि जलदगतीने प्राप्त करता येते. यासाठी ग्रंथालयात कुशल मानव संसाधनांची गरज आणि आवश्यकता भासते.

(६) **माहिती सेवा आणि संदर्भ सेवा व्यवस्थापनासाठी:** ग्रंथालयातील उपभोक्त्यांच्या माहितीच्या गरजा या वेगवेगळ्या असतात. यासाठी ग्रंथालयाद्वारे काही ठराविक वाचकांसाठी माहिती सेवा आणि संदर्भ सेवा या दिल्या जातात. जेणेकरून त्या उपभोक्त्यांना त्यांना लागणारी माहिती ही वेळेवर प्राप्त

होते आणि त्या माहितीचा उपयोग त्यांना त्यांच्या कामात करता येतो. अशी ठराविक माहिती उपलब्ध करून देणे हे कार्य इतके सहज नाही. संशोधन ग्रंथालयांत तर या कामासाठी असणाऱ्या कर्मचाऱ्यांना Information Scientist म्हणूनसुद्धा संबोधले जाते.

## कुशल मानव संसाधन निर्मितीचे तंत्र

(१) **योग्य कर्मचाऱ्याची निवड आणि योग्य ठिकाणी नियुक्ती :** ग्रंथालयाच्या कामाचा विचार करून त्याच योग्यतेच्या व्यावसायिक कर्मचाऱ्यांची निवड करणे व त्यांची शैक्षणिक पात्रता आणि आवड लक्षात घेऊन योग्य ठिकाणी नियुक्ती करणे. कर्मचाऱ्यांना त्यांच्या कामानुसार आणि गुणवत्तेनुसार पगार मिळेल यांसाठी प्रयत्न करणे.

(२) **प्रशिक्षण आणि मार्गदर्शन :** ग्रंथालयातील मानव संसाधनांना कुशल आणि जास्त उपयोगी बनविण्यासाठी वेळोवेळी प्रशिक्षण शिबिर भरविणे, त्यांना कामाबाबत मार्गदर्शन करणे, कामात आवड निर्माण होण्यासाठी त्यांच्या केलेल्या कामाला आणि प्रयत्नांना वाव देणे, जेणेकरून त्यांना स्वत:हून काम हाती घेणे आवडेल.




**तक्ता. क्र. १ : प्रशिक्षण आणि विकासाचे परिणाम**

(३) **कार्याधारित बढती:** कर्मचाऱ्यांचे काम आणि त्या कामाची गुणवत्ता पाहून कर्मचाऱ्यांचे कामातील स्थान वाढविणे (बढती करणे), नवनवीन कार्य करण्यास प्रवृत्त करणे जेणे करून वर्षभर नवनवीन उपक्रमास चालना मिळते. वाचकांच्या प्रती प्राथमिकता देऊन कार्य करून घेणे. उपभोक्त्यांच्या दृष्टीने कार्य करण्यास भाग पाडणे.

(४) **कामामध्ये स्वतंत्रता देणे :** जर ग्रंथालयातील कर्मचाऱ्यांना कोणते विभाग किंवा जबाबदारी दिली असेल तर त्यासंदर्भात त्यांना योग्य तो निर्णय घेऊ देणे व त्यांच्या कामात वारंवार लक्ष न घालणे जेणे करून त्यांच्यात विश्वास निर्माण होतो व ते कार्य किंवा जबाबदारी ते आपली समजून करतात व त्यांच्या कुशलतेचा वापर करून चांगले परिणाम देतात.

(५) **कार्यशाळेत आणि प्रशिक्षण शिबिरात भाग घेऊ देणे :** ग्रंथालयातील तांत्रिक पदावर काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांनासुद्धा कार्यशाळेत भाग घेऊ देणे. जेणेकरून ग्रंथपालांना कर्मचाऱ्यांचासुद्धा आधार होईल आणि कर्मचाऱ्यांनासुद्धा आपल्या कामाबद्दल अधिक माहिती प्राप्त होईल व कामाप्रती त्यांचात उत्साह निर्माण होईल.

**कुशल मानव संसाधनाचे फायदे**

(१) **चांगल्या प्रकारची सेवा आणि सुविधा देता येणे शक्य :** ग्रंथालयात वाढत जाणाऱ्या तंत्रज्ञानाचा वापर पाहता फक्त ग्रंथपालच प्रशिक्षित असून भागणार नाही तर चांगल्या सेवा आणि सुविधा देण्यासाठी कर्मचाऱ्यांनासुद्धा कुशल होणे गरचेचे आहे. कारण आज ग्रंथालयात पुस्तके शोधण्यापासून तर ई–बुक्स आणि जर्नल्सपर्यंत OPAC आणि Databases यांचा वापर फार मोठ्या प्रमाणात होतो. ग्रंथालयीन कर्मचारी जर कुशल असतील तरच ग्रंथालयांना चांगल्या प्रकारची सेवा आणि सुविधा देता येणे शक्य होते.

(२) **उपभोक्त्यांच्या संख्येत वाढ :** जर ग्रंथालयात कुशल कर्मचारी असतील व ग्रंथालयाच्या सेवा आणि सुविधा या चांगल्या असतील व वाचकांना हवी ती माहिती प्राप्त होत असेल तर निश्चितच ग्रंथालयाचा वापर वाढतो आणि ग्रंथालयाच्या उपभोक्त्यांच्या संख्येत वाढ होते. अशी वाढ ही सार्वजनिक आणि विशिष्ट वाचनालयासाठी (Profitable for Public Special Libraries) फायदेशीर ठरू शकते.

(३) **ग्रंथ आणि ग्रंथेतर साहित्यांचा योग्य वापर :** कुशल कर्मचारी हा तेथील उपलब्ध असणाऱ्या ग्रंथ आणि ग्रंथेतर साहित्यांचा योग्य वापर करण्यास उपभोक्त्यांना प्रेरित करू शकतो किंवा हवी असलेली माहिती ही जी कुठेही असेल ती शोधून देऊ शकतो. यामुळे ग्रंथालयातील ग्रंथ आणि ग्रंथेतर साहित्यांचा योग्य वापर करून घेणे शक्य होते.

(४) **ग्रंथपालांना दैनंदिन कामात लक्ष न देता विकासकामांत लक्ष देणे शक्य होते :** जर ग्रंथालयातील कर्मचारी हे कुशल आणि त्यांच्या कामात पारंगत असतील तर त्या ग्रंथालयातील ग्रंथपालांना दैनंदिन कामात वारंवार लक्ष देण्याची गरज भासत नाही व ते ग्रंथालयाच्या विविध विकास योजना आणि प्रकल्पांना हात घालू शकता व ग्रंथालयाची गुणवत्ता आणि दर्जा उंचावू शकतात.

(५) **उपभोक्त्यांना समाधानी करता येणे शक्य :** चांगल्या प्रकारच्या सेवा आणि सुविधा देण्यासाठी व ग्रंथालयातील ग्रंथ आणि ग्रंथेतर साहित्यांचा योग्य वापर करून घेण्यासाठी कुशल कर्मचाऱ्यांची आवश्यकता आहे आणि या कर्मचाऱ्यांद्वारे येणाऱ्या ग्रंथालयांच्या उपभोक्त्यांना समाधानी करून त्यांच्या माहितीच्या गरजा पूर्ण करणे शक्य आहे.

## सारांश

ग्रंथालय हे एक ज्ञानकेंद्र आहे, ज्याचा उद्देश हा समाजातील प्रत्येक घटकाला माहिती व ज्ञान उपलब्ध करून देणे असा आहे, परंतु माहिती आणि ज्ञान उपलब्ध करून देण्यासाठी ग्रंथालयांना कुशल आणि पारंगत असलेल्या कर्मचाऱ्यांची नितांत आवश्यकता आहे. जर ग्रंथालयातील कर्मचारी हा कुशल आणि ग्रंथालयाच्या कामात पारंगत असेल तर ग्रंथालय हे निश्चितच चांगल्या प्रकारे सेवा आणि सुविधा देऊन आपल्या उपभोक्त्यांना समाधानी करू शकतात व त्यांच्या माहितीच्या गरजा पूर्ण करू शकते. कुशल कर्मचाऱ्यांमुळे ग्रंथालय हे सेवा आणि सुविधा देण्यासाठी अद्ययावत तंत्रज्ञानसुद्धा वापरू शकते. जर ग्रंथालयांत कुशल मानव संसाधन असेल तर ग्रंथपालांना ग्रंथालयांच्या दैनंदिन कामात विशेष लक्ष देण्याची गरज भासत नाही व त्यांना विविध विकास योजना आणि प्रकल्पांना हाती घेऊन पूर्णत्वास नेणे शक्य होते. या सर्व गोष्टींचा अभ्यास केल्यानंतर असे लक्षात येते की, ग्रंथालयाच्या दैनंदिन कामापासून तर उपभोक्त्यांच्या समाधान आणि ग्रंथालयाच्या विकासासाठी कुशल मानव संसाधन असणे फार आवश्यक आहे. कुशल मानव संसाधनांचा फायदा हा सार्वजनिक ग्रंथालयाच्या दृष्टीने आर्थिक स्वरूपातसुद्धा होऊ शकतो.

## संदर्भ

(१) https://hi.wikipedia.org/wiki/मानव_संसाधन_प्रबंधन
(२) मानव संसाधने व मूल्याधिष्ठित समाजनिर्मिती, गांगुर्डे, उमेश वाय: अथर्व पब्लिकेशन्स, जळगाव;
(३) गांगुर्डे उमेश वाय (२०१४) मानव संसंधने व मुल्याधिष्ठित समाज निर्मिती, जळगांव : अथर्व पब्लिकेशन्स
(४) सातारकर, एस. पी. (१९९५) ग्रंथालय व्यवस्थापन, नांदेड : अभय प्रकाशन
(५) https://journals.tdl.org/llm/index.php/llm/article/viewFile/1729/1009
(६) http://eprints.rclis.org/25496/1/Rahmanš-Strategic%20human%20resources%20management%20in%20digital%20library%20context.pdf
(७) http://www.ncl-india.org/files/Library/Default.aspx
(८) Knowledge Resource Centre - Indian Institute of Plantation Management.
(९) Knowledge Resource Centre (Library) - GIT-AM University
(१०) Knowledge Resource Centre- Library Central Drug Research Institute
(११) http://www.rcfltd.com/index.php/hi/hr/hrd

# प्रा. जे. एच. शेरा यांची तत्त्वप्रणाली – भाग १

डॉ. प्रदीप कर्णिक

*ग्रंथालय आणि माहितीशास्त्र या विषयातले विचारवंत प्रा. जे. एच. शेरा यांनी १९६५ साली Social Epistemological Foundatiim for Libraries नावाची तत्त्वप्रणाली मांडली, सातत्याने त्याबाबत आपले लेखन प्रसिद्ध केले. १९९५ साली जे. एम. बड यांनी शेरा यांच्या तत्त्वप्रणालीकडे पुनर्भेट देण्याची आवश्यकता विशद केली व त्यांच्या विचाराचा चिकित्सकपणे ऊहापोह केला. शेरा यांचे विचार नेमके कसे आहेत, त्यांच्या विचारांवर टीकाकारांची मते काय आहेत आणि इतक्या वर्षांनंतरही ते कसे लागू पडतात या सर्वांचा हा आढावा.*

Social Epistemology या तत्त्वप्रणालीवर प्रा. जे. एच. शेरा यांनी सातत्याने भर दिलेला दिसून येतो. ग्रंथालय आणि माहितीशास्त्र या शाखेत अलीकडे या प्रणालीचा विचार विस्ताराने आणि खोलात जाऊन केला जातोय.

Social Epistemology चा विचार पुढील मुद्यांच्या आधारे करणे आवश्यक आहे.

(१) जे.एच.शेरा यांना अभिप्रेत असणारी Social Epistemology ची प्रणाली नेमकी कशी आहे ? त्यात त्यांनी नेमके काय मांडले आहे.

(२) शेरा यांच्या SE प्रणालीचा विचारवंतांनी कसा स्वीकार केला ? त्याबाबत काही मतभेद आहेत का?

(३) शेरा यांच्या दृष्टिकोनातून आणि विचारवंतांच्या मतांनुसार या प्रणालीचा पुनर्विचार करावा काय? केल्यास तो काय असेल ?

(४) ही प्रणाली वापरून एखाद्या ग्रंथालयाचे विश्लेषण करणे शक्य आहे काय? असल्यास त्या विश्लेषणाचे स्वरूप कसे असेल/ असावे?

या मुद्यांचा विस्ताराने विचार करणे आवश्यक आहे.

## (१) जे. एच. शेरा यांचा सोशल ऍपिस्टेमॉलॉजी बाबतचा दृष्टिकोन

१९५२ साली Social Epistemology ही संकल्पना जे. एच. शेरा यांनी प्रथम वापरली तरी त्या संकल्पनेचे श्रेय शेरा यांनी Margaret E. Egan[१] यांना दिले आहे. पुढे मात्र आयुष्यभर शेरा यांनी या संकल्पनेच्या विस्तारासाठी सातत्याने प्रयत्न केले.

काय आहे शेरा यांची ही संकल्पना ? शेरा यांना अभिप्रेत असणारी SE ची संकल्पना पुढीलप्रमाणे आहे -

'An Epistemological Foundation for Library Science'[२] या प्रकरणात जे. एच. शेरा यांनी Social Epistemology चा विस्ताराने विचार केला आहे. शेरा याचा विचार पुढील प्रमाणे करतात -

(1) Need of Information

(2) Need of New Epistemological Disicipline

(3) The Nature of knowledge

(4) The classification of knowledge

(5) Social Epistemology and the Sociology of knowledge

(6) Social Epistemolgy and the Library

वरील सहा मुद्यांचा विचार विस्ताराने लक्षात घेणे आवश्यक आहे, त्याशिवाय शेरा यांची संकल्पना स्पष्ट होणार नाही.

### १.१ माहितीची गरज (Need of Information)

शेरा मानवाच्या मूलभूत गरजांपासून विचार करतात. हवा, पाणी, अन्न आणि निवारा या मानवाच्या चार मूलभूत गरजा आहेत. मानवाच्या या चार गरजांमध्ये John Reader Platt यांनी 'Information' पाचव्या गरजेचा समावेश केला, त्याचा आधार शेरा घेतात.[३]

> "The Fifth need of man is the need for what can be called - in a mathematical sense- 'Information' for a continuous, novel, unpredictable, nonredundent and surprising flow of stimuli."

Platt यांचे हे वाक्य उद्धृत करून शेरा असे प्रतिपादन करतात की माहिती (Information) ही मानवाच्या मेंदूची गरज आहे.[४]

"The brain also exists in order to organise and to weave pattenrs from information presented to it, and it becomes seriously deranged if this essential opportunity is denied. This activity of organising input information not only characterizes the sane mind but is also necessary to maintenance of sanity."

मेंदूला ही गरज सातत्याने पडत असते. नवनवीन माहिती जमा करणे, त्याची प्रक्रिया (Process) करणे ही क्रिया nervous system चा एक भाग झालेला असतो. मानवाच्या बौद्धिक विकासामध्ये या प्रक्रियेचा फार मोठा वाटा आहे. तसेच मानवाची शिकण्याची जी क्रिया असते त्यासाठीही या प्रक्रियेची गरज असते. मेंदूचा अत्यंत लहान भाग जन्मत:च मानवाबरोबर येतो, पण त्याच्या मोठ्या भागाचा विकास मात्र Stimulation आणि अनुभवामुळेच होतो.

मेंदूच्या या गरजेबाबत शेरा यांनी असे मत मांडले आहे की, माणसाच्या जगण्यासाठी माहितीची (Information) आवश्यकता असते. त्याशिवाय माणसाचे अस्तित्वच धोक्यात येईल.[५]

"A constant need of the brain for something upon which to feed - for information - may be seen as a basic human drive, and the power to communicate becomes not a happy and fortuitous invention, but an inevitable essential to man's survival."

शेरा यांनी मेंदूच्या या गरजेची आवश्यकता एका व्यक्तीच्या बाबत मांडून हीच गरज व्यक्तिसमूहाच्या म्हणजे समाजाच्या बाबतीतही आहे, या विषयाकडे ते अभ्यासकांचे लक्ष वेधतात. शेरा यांच्या या भाष्यातून ग्रंथालयाच्या दृष्टीने अनन्यासाधारण महत्त्व आहे.

इथून शेरा समाजाकडे वळतात आणि नवीन ज्ञानशाखेच्या गरजेची संकल्पना प्रस्थापित करतात.[६]

For the discussion and analysis of the society's need for information, Shera argues that there is a need for new discipline as the then existing discipline of Epistemology considers only information need at individual level.

## १.२ नवीन ज्ञानशाखेची गरज

SE प्रणालीचा पाया शेरांच्या मते संप्रेषण (Communication) आणि

माहिती (Information) हा आहे व त्याच्याशिवाय समाजाची बौद्धिक प्रगती होऊ शकत नाही, तसेच समाजाची ती अंगभूत व मूलभूत गरज आहे, माहिती (Information) आणि ज्ञान (knowledge) यांतला फरक शेरा यांना Epistemology च्या विचारांकडे नेतो.

जे. एच. शेरा पुढे मात्र Epistemology च्या प्रांतात प्रवेश करतात. या शाखेचे तज्ज्ञ Epistemology या क्षेत्रात, ज्ञानाचा विचार 'a body of knowldge about knoweldge itself 'असा करतात. पण अभ्यासानंतर त्यांना असे आढळून आले की या ज्ञानशाखेचा अभ्यास व्यक्तीच्या बौद्धिक विकासाच्या संदर्भातच करण्यात येतो. "The study of epistemology has always been seen against a background of the intellectual processes of an individual." आणि त्याबाबत अजून अधिक संशोधन होण्याची गरज आहे. ती गरज शेरा यांनी अशी मांडली आहे की,[७]

"The manner in which knowledge has developed and has been augmented has long been a subject of study, but the ways in which knowledge is coordinated, integrated and put to work is, as yet, an almost unrecognised field for investigation."

शेरा पुढे जाऊन असंही मांडतात [८] की "neither epistemologists nor psychologists have developed an ordered and comprehensive body of knowledge about intellectual differentiation and the integration of knowledge within a complex social organization.

इथे शेरा समाजाच्या बौद्धिक विकासप्रक्रियेच्या अभ्यासाची गरज विशद करतात. व्यक्तीच्या बौद्धिक विकासाची प्रक्रिया आणि समाजाच्या बौद्धिक विकासाची प्रक्रिया यात मूलभूत फरक असल्याने शेरा यांना नवीन ज्ञानशाखेची आवश्यकता भासते.[९] ही ज्ञानशाखा म्हणजे Social Epistemology.

"The new discipline that we here envisage (and which, for want of a better name, we have called social epistemology) should provide a framework for the effective investigation of the entire complex problem of the intellectual proceses of society - a study by which society as a whole seeks a perceptive relation to its total environment."

समाजाच्या बौद्धिक विकास प्रक्रियेच्या अभ्यासाचा प्रमुख झोत (focus) सुद्धा काय असायला हवा हेही शेरा यांनी नमूद केले आहे.[१०]

"The focus of this new discipline will be upon the production, flow, integration and consumption of all forms of communicated thought throughout the entire social problem. From such a discipline should emerge a new body of knowledge about, and a new synthesis of the interaction between knowledge and social activity."

या विचारामध्ये निर्मिती (Production), प्रवाह (Flow), एकसंघता (Integration), आणि वापर (Consumption) याला महत्त्व तर आहेच; पण त्याचबरोबर ज्ञान (Knowledge) आणि सामाजिक क्रिया (Social activity) मधील देवाणघेवाणीला (Interaction) शेरा यांनी महत्त्व दिले आहे.

वैचारिकतेच्या निर्मितीचे सर्व प्रकारचे घटक (forms) हे सामाजिक प्रश्नांबाबतच्या (Social Problem) संप्रेषण माध्यमातून कसे (Communicate) होतात याकडे शेरा यांनी लक्ष पुरवले आहे. सामाजिक क्रिया आणि ज्ञान यांचे आदानप्रदान कसे होते या संशोधनावर नवीन ज्ञानशाखेचा भर असला पाहिजे असे शेरा यांना वाटते.

त्यामुळे शेरा 'ज्ञान' या संकल्पनेच्या आणखी मुळाशी जाण्याचा प्रयत्न करतात. लिखित स्वरूपाचे जे ज्ञान आहे त्याच्या बद्दलची समज असणे इतकीच आवश्यकता पुरेशी नाही, तर ज्ञानाचा समाजातील भाग (Role) काय आहे ते पाहणे अत्यावश्यक आहे असे त्यांना वाटते.

या सामाजिक भूमिकेच्याही (Role) मुळाशी जाण्यासाठी शेरा काही प्रश्नच उपस्थित करतात.[११]

(1) How man knows ?
(2) How society knows ?
(3) How personal knowledge becomes social knowledge ?
(4) How the history and philosophy of knowledge have evolved through time and in various cultures ?
(5) How the library mechanisms and systems are useful to communicate the knowlege to the society ?

## १.३ ज्ञानाचे स्वरूप (The Nature of Knowledge)

शेरा यांनी उपस्थित केलेल्या प्रश्नांचा विचारही त्यांनी अनेक प्रकारचे दाखले देऊन केला आहे.

ज्ञान म्हणजे काय (What knowledge is) याचा विचार करताना शेरा Webster's च्या तिसऱ्या आवृत्तीत विचार करतात. या Dictionary ने १२

व्याख्या दिल्याचे त्यांनी नमूद केले आहे. 'Syntopicon of the Great Books of the Western World' या पुस्तकाचाही दाखला त्यांनी दिला आहे. Karl Deutsch, Kenneth Boulding यांच्या Term चा ही विचार केला आहे.

तात्त्विक विचारांच्या चर्चेकडून ते Boulding[१२] यांच्या विचाराचा स्वीकार करतात, कारण ग्रंथालयाच्या संदर्भात त्या संकल्पनेला महत्त्व आहे.

"We follow Boulding in distingusihing between information and knowledge, despite Fritz Machlup's proposal " that we get rid of the duplication 'knowledge and information' ..... we may occasionally refer to certain kinds of knowledge as 'informatiom', but we shall avoid, the redundant phrase 'knowledge and information'. The present writer, however, sees, a clear distinction between the two, probably derived from the terminology of informatiom theorists : information is the input of knowledge and is always received through the senses, no matter what or how many devices may intervene betwneen transmitter and receptor."

ग्रंथालयांच्या संदर्भात आणखी मूलभूत विचाराकडे शेरा ज्ञान आणि माहितीच्या संदर्भात गेले आहेत.[१३]

"The extent to which the library as an information system is involved in the knowledge-situation is not accidental. The use of the library and the knowledge-situation are generically related in much as the former is one manifestation of the latter. The knowledge situation, or knowledge process, is a unity of subject vehicle, and object."

या व्याख्या स्पष्ट होण्यासाठी शेरा यांनी आकृतीही (digram) सादर केली आहे.[१४]

| | | |
|---|---|---|
| The Library User (Subject) | The Library's Bibliographic Apparatus (vehicle) | Intellectual Content of the Library Store (Object) |

या आकृतीच्या स्पष्टीकरणार्थ शेरा असे नमूद [१५] करतात की,

"The Library is more than an important link in the communicaton chain, as an intellectual system it is part of the total knowledge-situation. The Librarian must be concerned not only with that which is known, but also with the intellectual condition

or state of knowing. This condition is both personal and social, and the librarian must operate in two worlds at once, the microcosm of the individual and the, macrocosm of the culture in which the individual resides and with which he must work out a harmonious relationship."

ज्ञानाच्या संदर्भात शेरा जास्त महत्त्व माहिती आणि संप्रेषणाला देत असले तरी ज्ञानाचे जे वर्गीकरण अनेक तज्ज्ञांनी केले आहे त्याकडेही ते लक्ष पुरवतात.

### १.४ ज्ञानाचे वर्गीकरण

ज्ञानाच्या वर्गीकरणाचा विचार करतानाही शेरा यांनी अनेक तत्त्वज्ञ मंडळींची वर्गीकरण पद्धती विचारात घेतली आहे. विशेष म्हणजे डॉ. एस. आर. रंगनाथन यांच्या वर्गीकरणाचाही विचार केला आहे.

शेरा ज्ञानाच्या वर्गीकरणाचा विचारही संप्रेषणाच्या अंगानेच करतात.[१६]

"The study of the functions of knowledge in society asks the question, 'who knows, and why and for what purpose?' Thus, there can be no absoultes in the classification of knowledge according to function. Instrumental knowledge, to use Scheler's grouping, for the professional man may be intellectual knowledge for layman : a knowledge of thermodynamics is instrumental knowledge for the physicist and intellectual knowledge for the librarian, while the understanding of the principles of bibliographic organization is instrumental to the librarian and intelletual to the physicist. To the bibliophile, however, the lore of books is probably more spiritual than eighter instrumental or intelectual."

Machlup च्या वर्गीकरण पद्धतीचाही शेरा विचार करतात. त्याचे कारण "the subjective meaning of the knonwn to the knower is the most useful for persent purposes" असे त्यांना वाटते. त्यासाठी ते त्याचे ५ प्रकारही सांगातत आणि

"subjectively new and socially new knowledge यामधला फरकही नोंदवतात आणि ग्रंथपाठाच्या दृष्टीने त्याचे महत्त्वही विशद करतात.[१७]

" Investigations into the rate of obsolescence of knowledge are still far form exetensive and would be of tremendous value to the librarian, even through social utility is not necessarily to be measured only in terms of its rate of decay."

यानंतर ते Sociology of knowledge च्या चर्चेकडे वळतात.

**१.५ Social Epistemology and the Sociology of Knowledge**

Kenneth Boulding आणि Don K. Price यांच्या विचारांचा आढावा[१८] घेऊन शेरा अस नमूद करतात की,

Social epistemology is related to, but in a sense is the reverse of, the sociology of knowledge. The sociology of knowledge reveals very clearly the distinction between information and knowledge, for the former does not admit of sociohistorical perspective.

The assertion, to cite the simplest example that two plus two equals four gives no clue as to when, where, and by whom it was formulated. Perspective becomes important when the validity of the information is in doubt. We cannot here become involved with a consideration of the nature of truth, but it is important to record that it is at the point of validation, that information passes the barrier into knowledge."

Sociolgy of knwoledge च्या संदर्भात ते संस्कृतीचाही विचार करतात; पण त्यासाठी ते Boulding यांचाच दाखला देतात.[१९]

"Every culture, as Boulding has shown, produces a 'transcript' a record in more or less permanent form which cab be handed down from generation to generation."

पुढे ते नमूद करतात- समाज ज्ञानाची प्राप्ती दोन माध्यमांतून करून घेतो. थेट अनुभव (direct experience) आणि लिखित नोंदी (the record or transcript) व ज्ञानीय सत्र (areas of knowledge) आणि विविध संस्कृती (different cultures) मधून हे ज्ञान समाजापर्यंत जाते.[२०]

"The growth of public knowledge is part and parcel of the growth and organization of society" असं नमूद करून Margaret Mead यांचा दाखला देतात.

ज्ञानाचे स्वरूप (Nature of knowledge), ज्ञानाचे वर्गीकरण (Classification of knowledge) आणि Sociology of knowledge या सर्वांचा विचार शेरा यांनी केवळ ५ प्रश्नांचा वेध घेण्यासाठी केला आहे. माणसाला ज्ञान कसे मिळते, समाजाला कसे ज्ञान मिळते, इत्यादी. ते ५ प्रश्न मागे आले आहेत.

शेरा यांनी हा जो वेध घेतला आहे. तो केवळ स्वत:च्या विश्लेषणाद्वारे नसून त्यासाठी त्यांनी अनेकांचे दाखले दिले आहेत. या विश्लेषणाद्वारे ते कायम संप्रेषणाचा मुद्दा अधोरेखित करतात.[२१]

Social Epistemology आणि ग्रंथालयाच्या संदर्भात विचार करताना तर तो अधिकच स्पष्ट होतो.

### १.६ Social Epistemology and the Librany

ग्रंथालयाचा विचार करताना ते प्रामुख्याने ग्रंथपाल आणि ग्रंथपालन व्यवसाय या घटकाची कर्तव्ये, हेतू आणि जबाबदारी दाखवून देण्याचा प्रयत्न करतात.

"Librarianship is primarily concerned with the utilization of the social transcript by human beings it is fundamentally a behavioristic science, but because the method and findings of the physical and biological sciences are being increasingly applied to the study of human behavior, librarianship must be 'scientific' even in the classical use of the term."

पुढे ते असंही म्हणतात-[२२]

"The librarian's responsibility is the efficient and effective management of the transcript, the graphic record of all that society knows about itself and its world."

'The Library as an Agency of Social Communication' या लेखात ग्रंथालयाच्या भूमिकेविषयी त्यांनी अधिक अचूक दिशा दाखवून दिली आहे.[२३]

"The complex communication system that operates today in the western world depends upon many instrumentalities, of which the library is but one. One need not dwell upon the impact that the telegraph, the telephone, the radio and television, not to mention the newspaper and the periodical, have made upon the communication patterns of our society. Each of these has had its effect upon the role of the library. With them has come a new urge on the part of the librarian to assume a vigorously active role in communication. Librarians no longer are content to accumulate materials in anticipation of use, but seek to engage actively in bringing their resources to the attention of those who need them. The growing importance of all types of graphic records to the successful operation of contemporary society, conditioned as it is

by and to science and technology, has forced the librarian to search for and adopt new methods and techniques for making recorded information available not only to scholars but also to business, industry, and government. Effective use of the library has been demanded by the educational system, for elementary and secondary schools as well as institutions of higher learning. In recent years the introduction of automation into a variety of learning and teaching activities has provided the librarian with potentially powerful tools for increasing his effectiveness as a communicator, though the capabilities of these developments have not yet fully realized."

शेरा यांच्या Social Epistemology चा विचार नुसता तात्त्विक पातळीवरील चर्चा, असा न राहता, त्या विचाराला ते प्रात्यक्षिकाची जोड देतात. वस्तुत: Epsitemolyogy ही तत्त्वाज्ञानामधील (Theory of knowledge) शाखा आहे. Truth, Justification for belief अशा तात्त्विक संघटनेचा विचार त्यात केला जातो. Sociology of knowledge हीसुद्धा तत्त्वज्ञान आणि सामाजिक शास्त्र या विषयाची शाखा आहे. त्यात तर असा विचार केलाय की, समाजातील व्यक्तीच्या सहभागाला आणि त्याच्या सामाजिक आयुष्याला कोणती प्रेरणा आहे, त्याच्याकडील ज्ञानाचा, विचारांचा आणि संस्कृतीचा प्रभाव आहे का, आणि असल्यास तो प्रभाव कसा आहे ?

शेरा Epistemologyतील ज्ञानाचा सिद्धान्त आणि Social Epistemology
मधील संस्कृतीची प्रेरणा यांचे मिश्रण करून हे दाखवून देतात की, ग्रंथालयाचा पाया (Foundation) जर कोणता असेल तर तो Social Epistemology चाच आहे. याचे प्रमुख कारण शेरा यांना दिसून आले ते प्रत्येक ठिकाणी होणारे जे संप्रेषण आहे, तेच आहे.

संप्रेषण ही तर ग्रंथालयाची महत्त्वाची भूमिका आहे. त्यामुळे शेरा ही तत्त्वप्रणाली ग्रंथालयाला देऊन ग्रंथालयाची भूमिका अधोरेखितच करतात. त्यासाठी मार्गही सुचवतात.

शेरा यांच्या तत्त्वप्रणालीचा आढावा घेतल्यानंतर प्रश्न असा निर्माण होतो की LIS शाखेने या प्रणालीचा कसा स्वीकार केला ? तज्ज्ञांचे याबाबत मत काय? ते पाहणे आवश्यक ठरेल.

## (२) जे. एच. शेरा यांची तत्त्वप्रणाली आणि इतर विचारवंत

जे. एच. शेरा यांच्या Social Epistemology च्या संकल्पनेचा विचार दोन भागांत करणे आवश्यक ठरते.

(१) शेरा यांच्या काळात व्यक्त झालेले विचार

(२) शेरा यांच्या निधनोत्तर व्यक्त केलेले विचार.

या दोन्ही काळांत व्यक्त झालेल्या विचारांचा आढावा घेण्यापूर्वी शेरा यांच्याबद्दल थोडी माहिती देणे आवश्यक आहे.

जे. एच. शेरा यांचा जन्म ८ डिसेंबर १९०३ रोजी झाला.

"Over the years, he has been one of the leading commentators and theorists on the American library science. For several years he was a member of that outstanding team, the faculty of the Graduate Library School at the University of Chicago. Since his appointment as Dean of the school of Library Science at Western Reserve University in Cleveland, Ohio, he has brought it into the very front rank, both in its work of education for librarianship and through the center for Documentation and Communication Research in pushing forward the frontiers of knowledge in the development of our professional theory." असं D. J. Foskett यांनी लिहून ठेवलंय.[२४]

त्यांचा मृत्यू ८ मार्च १९८२ साली झाला. शेरा यांनी या काळात अनेक निबंध लिहिले, संशोधनपर पेपर, भाषणे आणि पुस्तके प्रसिद्ध केली. ७९ वर्षांच्या काळात त्यांनी सातत्याने Social Epistemology या संकल्पनेवर विचार केला. त्याचा विस्तार करण्याचा कसोशीने प्रयत्न केला.

त्यांच्या हयातीत व पश्चात या संकल्पनेवर ग्रंथालयशास्त्रातील तज्ज्ञांनी विचार व्यक्त केले आहेत. ते समजून घेणे उपयुक्त ठरेल.

### २.१ शेरा यांच्या काळात व्यक्त झालेला विचार

Social Epistemology ही संकल्पना निर्माण करण्याचे श्रेय शेरा यांनी Margaret E. Egan यांना जरी दिले असले, तरी त्यांनी स्वत:च असे नमूद केले आहे की,[२५]

"So far as the present writer knows, Miss Egan never used the phrase in any published writing, but she used it frequently in class lectures and in conversation."

Social Epistemology या संकल्पनेवर आधारित पहिला लेख 'Foundations of a theory of bibliograpy' हा Miss Egan आणि Shera यांच्या संयुक्त नावाने १९५२ साली The Libany Quarterly (vol. 22. No. 2, pp 125-37) मध्ये प्रकाशित झाला. पुढे मात्र Shera यांनी स्वतंत्रपणे या विषयावर लिहिले किंवा भाषणे दिली. त्यातून संकल्पना विस्तारत गेली.

१५ सप्टेंबर १९५४ रोजी Western Reserve University मध्ये 'In the Beginning was the Word' या विषयावर commencement भाषण शेरा यांनी केले. त्यातील काही भाग Documentation in Action (1956) या ग्रंथात समाविष्टही झाला. त्यात Social Epistemology या संकल्पतेच्या उल्लेखामध्ये तळटीपही[२६] दिली आहे.

" a fuller statement of this discipline is to be found in Foundation of a Theory of Bibliography."

१९६१ साली 'Willson Library Bulletin' (vol. 35, June, 1961) मध्ये 'Social Epistemology, General Semantics and Librarianship' (pp 767-770) हा लेख प्रसिद्ध केला.

१९६५ (ऑगस्ट) मध्ये शेरा यांचे 'Libraries and the Organization of Knowledge' हे पुस्तक प्रकाशित झाले. या पुस्तकात ' In the Beginning was the Word', 'Social Epistemology, General Semantics, and Librarianship', आणि 'Foundations of a Theory of Bibliography' हे लेख पहिल्या भागात समाविष्ट करण्यात आले आहेत. या पुस्तकाला D.J.Foskett यांची प्रस्तावना आहे.[२७] या प्रस्तावनेत Foskett यांनी Social Epistemology विषयी मत नोंदवले आहे.

"In the first section he gives a lucid account of 'social epistemology' - the function of recorded information in the actual working of society. It may at first appear a large claim, but, it is none the less true that the contemporary world could not exist without effective communication; and because we live in a world order (and not merely in a small city or nation state), in which millions of people and vast distances are involved, most communication has to be recorded. Librarianship has always been the profession of looking after the records of civilization and it is therefore proper that librarians should be involved at the centre of

thinking in the modern world. Shera's thesis is the 'documentation' - the extension of librarianship from the world of books to the world of information - is more than the mere preserving of information, necessary through that still is. It means also the dissemination of information, it means taking the initiative in creating channels along which information may pass quickly to those who can use it.

Such a role cannot be played extempore. It has to be carefully studied, and a technique elaborated."

१९६५ पर्यंत Social epistemology च्या संकल्पनेचे स्वरूप अत्यंत मर्यादित होते. या संकल्पनेचा विस्तार आणि खोलात जाऊन मांडणी करण्याचा प्रयत्न शेरा यांनी एका चर्चासत्रामध्ये वाचलेल्या पेपरमध्ये केला.

२८-३० जुलै १९६५ रोजी Syracuse University मध्ये 'The Foundaions of Access to Knowledge' या विषयावर झालेल्या चर्चासत्रामध्ये शेरा यांनी 'An Epistemological Foundation for Library Science' असा पेपर वाचला.

या पेपराला L. B. Heilprin यांनी प्रतिसाद दिला. शेरा यांचा पेपर आणि Heilprin यांचा प्रतिसाद इतर पेपरबरोबर Edwared B. Montgomery यांनी संपादित केलेल्या 'The Foundations of Access to Knowledge' या १९६८ साली प्रकाशित झालेल्या पुस्तकात समाविष्ट करण्यात आले.

पुढे शेरा यांनी या पेपरमध्ये अधिक भर घालून नव्याने पेपर लिहून काढला. तो या पुस्तकात समाविष्ट करण्यात आला आहे.

या नवीन पेपरचे स्वरूप विस्तारित तर आहेच; पण त्यात दोनतीन ठिकाणी शेरा यांनी L.B. Heilprin यांना उद्धृत केले आहे.

शेरा यांच्या विचाराल प्रतिसाद देणारे Heilprin हे त्यांचे पहिले महत्त्वाचे समीक्षक ठरतात.

L. B. Heilprin यांनी Social Epistemology विषयी असे लिहिले आहे की,[२८]

"Social epistemology is described as a new kind of epistemology - a theory of knowledge about how society knows as a whole. This apparently contrasts it with traditional epistemology... based on the knowledge of individual. However, we know only as individuals, never as a group or a society. The referent of the concept

'Society' is not a single superbeing but a set of individual... Evidently (the intent is ) to place a new comphasis on an old area. We need to study that part of access to knowledge which affects us all and on which we must act together."

शेरा यांना Heilprin यांचे विचार आणि प्रतिसाद महत्त्वाचा वाटला होता. त्यांनी या सुधारित लेखात Heilprin यांना उद्धृत तर केले आहेच, पण लेखाचा शेवट Heilprin यांचे दीर्घ अवतरण देऊन केला आहे.

याच लेखात शेरा यांनी दोन पुस्तकांचे दाखले दिले आहेत, की जी त्यांच्या संकल्पनेशी समांतर आहेत.

(1) Fritz Machlup यांचे 'The Production and Distribution of Knowledge in the United States'

(2) Frederick Harbison & Charles A. Myers यांचे 'Eductaion, Manpower and Economic Growth.'

या दोन्ही पुस्तकांबाबत शेरा यांनी असे म्हटले आहे की,[२९]

" In recent years there have appeared two inportant books that are aimed in the direction of providing a foundation for the kind of discipline here indicated, neither work could properly be called 'social epistemology' as the term is here employed, but each is dealing in certain ways with the problems with which 'social epistemology' is concerned."

हा समान दुवा खुद्द शेरा यांनाच सापडला असल्याने हाही संदर्भ महत्त्वाचा ठरतो.

१९५२ ते १९६८ असा कालवधी शेरा यांना ही संकल्पना अभ्यासपूर्ण मांडण्यासाठी लागला. पुढे ते या संकल्पनेच्या विस्ताराकडे फारसे वळलेले दिसत नाहीत.

ऑक्टोबर १९७३ मध्ये B.C. Brookers यांनी 'Journal of Librariansip' या नियतकालिकात 'Jesse Shera and the Theory of Bibligraphy' असा लेख लिहिला, तर Goldman Alvin यांनी 'Foundations of Social Epistemics' असा लेख 'Synthese' मध्ये (Oct.1973) लिहून त्यांच्या संकल्पनेचा एका परीने स्वीकारच केलेला दिसतो.

### २.२ निधनोत्तर व्यक्त झालेले विचार

'Social Epistemology' या संकल्पनेच्या अंगाने पुढील काळात विस्तार

झालेला दिसून येतो. यामध्ये Steve Fuller यांचा प्रामुख्याने विचार करायला हवा.

'Social Epistemology' नावाचे पुस्तक Fuller यांनी 1988 मध्ये प्रकाशित केले. १९९१ साली त्याची दुसरी आवृत्तीही प्रसिद्ध झाली. १९९६ साली त्यांनी American Philosophical Quarterly मध्ये ( vol. 33 pp 149-66) 'Recent work in social epistemology' असा लेखही लिहिला.

१९९४ साली F. E. Schmitt यांनी 'Sociallzing Epistemology. The Social Dimensions of Knowledge' असे एक पुस्तक लिहिले. असा विस्तार हे शेरा यांचेच श्रेय म्हणायला हवे.

संकल्पनेच्या अंगाने झालेला हा विचार आहे. याबरोबर दोन लेखांचा उल्लेख करायला हवा, जे शेरा यांच्या विचारांवर काही भाष्य करतात.

यामध्ये महत्त्वाचे नाव घ्यायला हवे J. M. Budd यांचे. यांनी दोन लेख लिहिले.

(1) The Library Quarterly (vol. 65 No.3) 1995 च्या अंकात Budd यांनी 'An Epistemological Foundation for Library and Information Science' असा लेख लिहिला.

(2) The Library Quarterly (vol. 72 No.4) ऑक्टोबर २००२ मध्ये 'Jesse Shera, Socialogist of Knowledge' असा लेख लिहिला.

दुसरे नाव आहे Jack Anderson यांचे. यांनी 'Journal of Documentaion, (vol. 58 No.4) च्या 2002 च्या अंकात "The Role of subject literature in scholarly communication. An interpretation based on social epistemology" असा लेख लिहिला आहे.

Jack Anderson यांनी शेरा यांच्या विचाराला LIS मध्ये स्वीकारले गेले नाही असे म्हटले आहे.

"In LIS social epistemology is particularly known through the writings of Egan and Shera (1952). They argued for social epistemology in connection with the creation of a theory of bibliography and defined social epistemology as '... the analysis of the production, distribution and utilization of inteletctual products' (Egan and Shera,1952, pp 33-4). Such an epistemology was needed, they, argued, because "Cassical" epistemology was/ is centered around ".. the intellectual processes of the individual (Egan and Shera, 1952, p, 132). As a consequence "Classical" epistemology cannot come up with an answer as to what the social - epistemic function of knowledge in Society (and in scinece and scholarship) is. However, Egan and Shera's social epistemology never received

that much attention in LIS (except for Wilson1983) which is a dedicated work to this area. Recently, however, Warner (1993,2001) among others, has revived social epistemology in connection with historical analyses of copyright acts viewed as public texts."

Anderson यांनी फक्त शेरा यांचे १९५२ मधलेच लेखन विचारात घेतलेले दिसते.

An Epistmological Foundation for Library Science (1968) हा लेख विचारात घेतला असता तर कदाचित असे मत मांडले नसते.

ग्रंथालयशास्त्राने शेरा यांच्या संकल्पनेला स्वीकारले नाही असे जे Anderson म्हणतात तेही बरोबर नाही.

J. M. Budd यांनी 1995 साली लेख लिहून त्यांची दखल तरी घेतलीच; पण 2002 मध्ये जो लेख लिहिला त्याचा उद्देश असा होता :

"Througout his career, Jesse Shera suggested that social epistemology (SE) could provide librarianship with the intellectual basis it needed to evolve. While he spoke of social epistemology on a number of occasions, he did not articulate a completely clear and consistent idea of SE. Given an empasis on knowledge today, it may be time to revisit Shear's writing on SE what emerges is a fuzzy conception of knowledge and an approach that is more sociological than philosophical in nature. Shera's sociological grounding has hepled establish a foundation for the profession, but the foundation can be strengthened by the addition of a more strictly epistemological component."

या लेखामध्ये Budd यांनी शेरा यांच्या महत्त्वाच्या प्रत्येक विधानाचा विचार केला आहे. त्यातील त्रुटी निदर्शनासही आणल्या आहेत.

अलीकडेच प्रसिद्ध झालेला हा लेख असल्याने या लेखाचे महत्त्व शेरा यांच्या संकल्पनेचा पुनर्विचार (revisit) करण्यास उद्युक्त ठरेल असे म्हणतात येईल.

## (३) शेरा यांच्या तत्त्वप्रणालीचा पुनर्विचार

J.H. Shera यांच्या Social Epistemologyचा पुनर्विचार करण्याची आवश्यकता आहे. Budd यांनी तर त्याची गरज विशद करताना असे म्हटले आहे की,

"Shera's contribution in the area of SE is monumental, but the practice and study of LIS will benefit from a close examination of his ideas and what they imply for the field. His version of SE is, at the end of the day, Sociological. LIS may be in a better position to grow and develop if the implications for knowledge of Shera's writings related to the human use of the graphic record (and graphic record is defined broadly as information recorded in any usable format) were explored. Specifically, LIS can build upon the foundation Shera has provided us by incorporating epistemological grounding into his sociological program."

Budd यांच्या विधानातील 'Close examination of his ideas' हा संदर्भ आणि 'human use of the graphic record' ही संकल्पना वाढवून विस्तारली पाहिजे असे जे सांगितले आहे ते फार महत्त्वाचे आहे.

या व्यतिरिक्त काही गोष्टीही नमूद करायला हव्यात.

(१) शेरा यांनी सर्व चर्चेमध्ये जास्त भर हा ग्रंथपाल किंवा ग्रंथपालन व्यवसायावर दिला आहे. हाच भर जर ग्रंथालय या घटकाला डोळ्यासमोर ठेऊन दिला गेला असता, तर शेरा यांना एखादे 'मॉडेल' विकसित करणे नक्कीच शक्य झाले असते.

(२) शेरा हे व्यवसायाने Libray and Information Science School चे प्राध्यापक/डीन असल्याने त्यांना ग्रंथपाल घडवण्यात जास्त रस होता असे दिसते. ते जर व्यवसायाने ग्रंथपाल (Practicing Librarian) असते तर त्यांनी नक्कीच ग्रंथालय या घटकाला केंद्रस्थानी आणले असते आणि त्यांचे विवेचन वेगळ्या दिशेने गेले असते.

(३) 'Social Epistemology' या संकल्पनेवर विचार करताना ते व त्यांचे विचार (आणि भाष्यही) तत्त्वज्ञानाच्या चर्चेत जास्त शिरलेले दिसते. Epistemology ची स्वतंत्र शाखा निर्माण करण्यात आणि त्याचे व्यासपीठ ग्रंथालयाला मिळवून देण्यात त्यांना अधिक रस होता असे दिसते व म्हणून ही चर्चा तत्त्वज्ञानाच्या प्रांतातली किंवा सामाजिकशास्त्राच्या प्रांतातली जास्त प्रमाणात झाली आहे.

(४) त्यांनी Communication आणि Communicable या संज्ञांना महत्त्व दिले असले तरी त्याचे प्रत्यक्ष कार्य कसे असायला हवे हे मात्र विस्ताराने विशद केले नाही.

(५) ज्ञान या संकल्पनेचा शोध त्यांनी खोलात जाऊन घेतला आहे. तत्त्ववेत्त्यांचे दाखलेही दिले आहेत, तरीही माहितीचे ज्ञानामध्ये रूपांतर कसे होते, केव्हा होते व का होते याचा शोध घेतला नाही. हे ज्ञान पुन्हा समाजात कसे जाते याचाही विचार विस्ताराने केला नाही.

# प्रा. जे. एच. शेरा यांची तत्त्वप्रणाली : भाग–२

**डॉ. प्रदीप कर्णिक**
ग्रंथपाल – डी. जी. रूपारेल महाविद्यालय,
माटुंगा, मुंबई
ईमेल : karnikpl@gmail.com

***मागील लेखामध्ये शेरा यांच्या तत्त्वप्रणालीचा विचार मांडलेला आहे. उत्तरार्धात शेरा यांच्या प्रणालीवरील भाष्य देण्यात आले आहे. शेरा यांची प्रणाली एखाद्या ग्रंथालयाला लावून तपासता येईल काय? याकडे लेखकाने लक्ष वेधले आहे.***

**Dicussion about Knowledge**

प्रथम शेरा यांनी Knowledge च्या संदर्भात जे पाच प्रश्न निर्माण केले आहेत, तेथूनच चर्चेला सुरुवात करणे सयुक्तिक ठरेल.

## १) माणसाला ज्ञान कसे प्राप्त होते? How Man Knows?

तात्त्विक चर्चा शेरा यांनी केली आहेच. इथे समाजात नेमके काय घडते, ते पाहणे आवश्यक ठरेल. मुळात एका प्रश्नाचे उत्तर देणे आवश्यक आहे. तो प्रश्न पुढीलप्रमाणे ज्ञान कशाला म्हणायचे? आणि माहिती (Information) कशाला म्हणायचे? यातील विभाजन रेषा कोणती ?

माणसाला काही वस्तूंची, घटनांची, व्यक्तीची, देशाची माहिती होते (प्रथमच किंवा नव्याने वा अधिक भर घालून) त्याला ज्ञान म्हणायचे काय? की त्याला अमुक अमुक गोष्टीची माहिती झाली असे म्हणायचे ?

माणूस ज्ञानाच्या प्रक्रियेत केव्हा प्रवेश करतो? कोणत्या स्वरूपाची माहिती त्याला 'ज्ञान' मिळविण्याला उद्युक्त करते? माणूस त्या माहितीचे ज्ञानात रूपांतर करतो म्हणजे नेमके काय करतो? काय घडते? हे ज्ञान देणारे घटक कोणते? या प्रश्नांची उत्तरे शोधायला हवीत; तरच काही सांगता येणे शक्य आहे. त्यासाठी काही आकृतीद्वारे हे मांडून पाहूया.

**माहितीचा प्रवाह (Flow Of Information)**

व्यक्तीकडे माहिती येण्याचे अनेक मार्ग आहेत /असतात. मूल लहान असताना अनुभव व निरीक्षण (आणि अनुकरण) यातून शिकत जाते. स्वत:चे, इतरांचे व वाचलेले अनुभव माणसाला माहिती पुरवत असतात. निरीक्षणाचेही तसेच आहे. संवादातून, वाचनातून, परंपरागत आलेल्या माहितीतून त्याला अनेक गोष्टी ज्ञात होतात. काही वेळा आत्मप्रेरणेतूनही माहिती मिळते.

या त्याच्यापाशी आलेल्या माहितीचे काय होते? तिचा संबंध स्मृतीशी (Memory) आहे

**स्मृतीचा प्रवाह (Flow Of Memory)**

व्यक्तीकडे येणाऱ्या माहितीचे रूपांतर काही वेळा तात्पुरत्या स्मृतीत होते व कालांतराने ती माहिती पुसली जाते. काही अर्धजागृत मनात (Subconcious mind) मध्ये जाऊन स्थिर होतात. कधीतरी, प्रसंगाने, वासाने, एखाद्या घटनेमुळे ती जागृत होते. काही माहितीचे विस्मृतीत रूपांतर होते. काही केल्या ती माहिती आठवत नाही. चौथा कप्पा पक्क्या स्मृतीचा तयार होतो. रस्ते, नाव , गाव, पत्ते, आठवणी, इत्यादीचा कोश तयार होतो. ह्या आठवणी कधी सुखद संवेदना निर्माण करतात, कधी दु:खद सुखद संवेदना पुन्हा पुन्हा मिळाव्यात असे वाटते; तर दु:खद नकोशा वाटतात. पक्क्या स्मृतीत गेल्यावर त्या उपयुक्ततेच्या कप्प्यात जातात. काही माहिती, कुतूहल / जिज्ञासा निर्माण करतात. हा कप्पा माहितीचे रूपांतर ज्ञानात करायला प्रवृत्त करतो. ही स्थिती अधिक माहिती मिळविण्यासाठी वा शोध घेण्यासाठी प्रेरणा देते. तिची पूर्तता झाली की त्या माहितीचे ज्ञानात रूपांतर व्हायला लागते. या पक्क्या स्मृतीतील काही माहिती पुन्हा १, २, ३, कप्प्यांतून प्रवेश करते.

कुतूहल /जिज्ञासा निर्माण करणारी माहिती शिकण्याच्या (learning) असते.

ज्ञानाचा जन्म कसा होतो ?

**ज्ञानाचा जन्म (Birth Of Knowledge)**

याबाबत पुढील पानावरील आकृती ३ पाहा.

शेरा यांच्या दुसऱ्या प्रश्नाकडे वळणे आवश्यक आहे. त्यांचा दुसरा प्रश्न असा आहे की समष्टीला ज्ञान कसे प्राप्त होते ?

**(२) समष्टीला ज्ञान कसे होते ? (How society Knows )?**

यामध्ये दोन प्रकारच्या संस्था संप्रेषणाचे (Communicatin) कार्य करतात. माहितीचे आदानप्रदान होते आणि संपूर्ण समाजाला ज्ञान /माहिती मिळते.

यामध्ये अनेक माध्यमांचा उपयोग होतो. संवाद, गप्पा, फोन, पत्रव्यवहार, भेटी, समारंभ यांद्वारे प्रत्यक्ष माहितीचे आदानप्रदान होते, तर कर्णोपकर्णाही माहिती पसरते. माहिती निर्मिती संस्थांव्दारे माहिती मिळते. तसा हा प्रवास सोपा आहे. इथे ग्रंथालयाचा Role शेरा म्हणतात त्याप्रमाणे फार मोठा आहे. ग्रंथालयाला ही प्रक्रिया माहीत असायला हवी; पण त्याहीपेक्षा शेरा यांच्या पुढच्या प्रश्नाची माहिती अधिक उत्तम असायला हवी. ती असेल तर ग्रंथालये आपली भूमिक अदा करू शकतात.

शेरा यांचा पुढचा प्रश्न आहे. How Personal Knowledge social Knowledge? व्यक्तिगत ज्ञान सामाजिक ज्ञान कसे बनते? त्याकडे आता वळायला हवे.

**(३) व्यक्तिगत ज्ञान समष्टीचे ज्ञान कसे होते?(How Personal Knowledge social Knowledge?)**

समाजात तीन प्रकारचे समूह असतात, ते पुढीलप्रमाणे:

(१) सामान्य माणूस

(२) समाज नेतृत्व

(३) संशोधक /लेखक / कलावंत / विचारवंत

शेरा यांनी चौथा प्रश्न असा निर्माण केलाय की, How the history and philosophy of Knowledge have evolved through time and in various cultures?

**(४) काळ आणि संस्कृतीचा ज्ञानावरील परिणाम**

ही क्रिया घडायला खूप कालावधी जातो. संस्कृती त्या त्या घटनांवर

परिणाम करतात आणि प्रक्रिया होत होत त्याचे रूपांतर इतिहासात किंवा तत्त्वज्ञानात होते. कोणताही शोध घटना, एकाकी इतिहास वा तत्त्वज्ञान घडवू शकत नाहीत.

शेरा नंतर ग्रंथालयांकडे वळतात. त्याबाबत ते असा प्रश्न निर्माण करतात की, How the library's mechanisms and systems are useful to communicate the Knowledge to the society?

या संदर्भात ते संप्रेषण आणि शाब्दिक अथवा चित्रित नोंदीला (Graphic Record) महत्त्व देतात. ते पुरेसे आहे का याचा विचार पुढे केला जाणारच आहे; परंतु ग्रंथालय या घटकाकडे 'ज्ञान' येण्याची प्रक्रिया काय असते, कशी असते ते लक्षात घ्यायला हवे. त्याशिवाय ग्रंथालयाच्या तांत्रिक पद्धती (Mechanism) आणि कार्यपध्दती (System) वर भाष्य करणे योग्य होणार नाही.

### (५) ज्ञान ग्रंथालयांपर्यंत कसे येते?(How Knowledge comes to the Library?)

हे समजून घेण्यासाठी मागच्या चार प्रश्नांच्या अनुषंगाने जे आकृतीच्या रूपात मांडले गेले ते एकत्रितरित्या मांडून पाहायला हवे. ती एकत्रित मांडणी पुढील पानावर दिली आहे.

ज्ञानाची (Knowledge) ही गुंतागुंतीची प्रक्रिया आपण समजावून घेतली. आता प्रश्न असा निर्माण होतो की, शेरा यांना Social Espistemology च्या नवीन ज्ञानशाखा अपरिचित आहे, असे ग्रंथपाल /ग्रंथालये आजही कार्यरत आहेत, मग SEचा पाया असावा /मिळवा असे शेरा यांना का वाटले ?

या प्रश्नाचा शोध घेऊ लागले तर निश्चित आपल्याला शेरा यांच्या संप्रेषण Communication आणि Communicable या संज्ञेच्या विचाराकडे यावे लागते.

शेरा यांना संप्रेषणमध्ये ग्रंथालयाची तांत्रिक पद्धती अभिप्रेत आहे आणि Communicable मध्ये ग्रंथालयाच्या कार्यपद्धती अभिप्रेत आहेत. याबाबत त्यांनी जे विचार मांडले आहे ते बारकाईने समजून घेण्याची आवश्यकता आहे. ते विचार काय आहेत ते पाहूया.

## शेरा यांच्या मते ग्रंथालयाची भूमिका

शेरा यांनी प्रथमच माहितीची गरज मेंदूला कशी आहे ते मांडले. माणसाची ही पाचवी गरज आहे यावर दुमत असण्याचे कारण नाही. माहितीची गरज भागवण्यासाठी संप्रेषण समाजात कसे घडते ते आपण मागे पाहिलेच आहे, पण संप्रेषणाच्या दोन पद्धती जर विचारात घेतल्या तर शेरा यांचे मत अधिक स्पष्ट होईल.

संवादातून संप्रेषण होते आणि शाब्दिक अथवा चित्रित नोंदीमधून संप्रेषण होते. कोणत्याही संवादातून निर्माण झालेल्या संप्रेषणाला स्थिर/टिकाऊ स्वरूप प्राप्त होत नाही. ते कालांतराने विस्मरणात जाते. Graphic शाब्दिक वा चित्रित नोंदीमधून (भाषा, ध्वनिफीत, चित्रफीत, चुंबकीय साहित्य, चित्रे इत्यादी ) जे संप्रेषण होते, त्यात एक स्थिरपणा, टिकाऊपणा असतो आणि म्हणूनच शेरा शाब्दिक वा चित्रित नोंदीना महत्त्व देतात.

आता असा प्रश्न निर्माण होतो की, शेरा या संप्रेषणसाठी ग्रंथालय हा घटकच का निवडतात? समाजात इतरही अनेक प्रकारच्या संस्था आहेत. सांस्कृतिक, सामाजिक, शैक्षणिक, आर्थिक, इत्यादी. अनेक प्रकारच्या संस्थांचा विचार शेरा का करत नाहीत? ते ‘ग्रंथालया’लाच हा पाया देण्याचा का प्रयत्न करतात ?

ग्रंथालयाव्यतिरिक्त ज्या इतर संस्था समाजात कार्यरत असतात, त्यांचा उद्देश, स्वरूप व कार्य त्या त्या विषयापुरते मर्यादित असते. काही अपवाद वगळता तिथे होणारे संप्रेषण एकमार्गी असते. (Once way communication)

एखादे उदाहरण घेऊन हे स्पष्ट करूया. सांस्कृतिक कार्य करणारी संस्था विविध प्रकारचे कार्यक्रम घेते. त्या कार्यक्रमांना, त्या विषयात रस असणारा समाजघटक हजर राहतो. भाषण, नाटक, परिसंवाद, सांस्कृतिक कार्यक्रम होतात. विचारांचे प्रदान होते (आदान होतेच असे नाही ) आणि तो विचार विरून जातो. समजा त्यातून एखादी पुस्तिका, अहवाल प्रसिध्द जरी झाला तरी तो त्या घटकापुरताच मर्यादित राहतो. समाजातल्या सर्व थरांपर्यंत हे विचार जात नाहीत.

ग्रंथालयाबाबत असे होत नाही. ग्रंथालयात सर्व प्रकारच्या वाचन साहित्याचा साठा केला गेल्याने विशिष्ट वाचकवर्गपुरता Role अदा करणे हे ग्रंथालयांना अभिप्रेत नसते. वृत्तपत्रे, मासिके, पुस्तके, अमुद्रित साहित्य, ग्रे लिटेचर, हस्तलिखिते अशा असंख्य प्रकारच्या शाब्दिक वा चित्रित नोंदीचा साठा

ग्रंथालयाकडे असतो आणि म्हणूनच शेरा यांना शाब्दिक वा चित्रित नोंदींच्या माध्यमातून होणारे संप्रेषण महत्त्वाचे वाटते. हे साहित्य काळाची मर्यादा ओलांडून टिकते. यांचा साठा ग्रंथालये करतात म्हणून शेरा ग्रंथालयाला हा पाया देऊ इच्छितात.

या संप्रेषणाच्या बाबतीत शेरा यांनी दोन घटक महत्त्वाचे म्हणून नमूद केले आहेत.

(१) Product, Flow, Integration, Consumption of all forms of communcated thoughts.

(२) Interaction between Knowledge and social activity

हे दोन घटक शेरा यांनी सांगितले, पण त्यांचा विस्तार न केल्याने शेरा यांची संकल्पना नीट समजून घेतली गेली नसावी.

### (१) विचार व्यक्त होणारे सर्व आकृतिबंध (All forms of communicated thoughts)

शेरा जेव्हा हा विचार मांडतात तेव्हा त्यांना ग्रंथालयात होणारे कोणते संप्रेषण अभिप्रेत आहे? याचा शोध घेण्यासाठी 'संवाद'चा विचार करणे भाग पडते. ग्रंथालयात पुढीलप्रमाणे संवाद घडतो.

(१) तालिकांद्वारा होणारा संवाद

(२) माहितीपत्रके/ नोटिसा यांद्वारे होणारा संवाद

(३) पुस्तके / नियतकालिकांद्वारा होणारा

(४) ग्रंथेतर साहित्याद्वारा संवाद

(५) संदर्भात देताना होणारा संवाद

हा संवाद एकमार्गी संप्रेषणाचा प्रकार राहत नाही. या सर्व संवादातील घटकांना शाब्दिकता, चित्रित स्वरूप असल्याने काही प्रमाणात आदानप्रदान होत असते. परंतु शेरा यांना इतकेच संप्रेषण अभिप्रेत नाही.

दोन व्यक्ती, समूह (किंवा एकटीच व्यक्तीही ) जेव्हा संवाद साधतात तेव्हा त्यांच्या संवादाला स्वाभाविक मर्यादा असतात. हा संवाद केवळ काहीच व्यक्तींमध्ये असतो, त्या संवादात जो विचार व्यक्त होतो, त्याबाबत इतरांना काय वाटते, त्यांचे त्याबाबत मत काय आहे हे जाणून घेण्याचे नैसर्गिक कुतूहल असते.

दुसरे असे की, एकाच समूहात संवाद साधण्यापेक्षा इतर समूहांबरोबर संवाद साधणे समाजघटक पसंत करतात, जे अपरिचित आहेत किंवा सहसा संवादासाठी कारणाशिवाय उपलब्ध होत नाहीत.

तिसरे असे की, समाजातील जाणकार व्यक्तीबरोबर, ज्ञानी माणसांबरोबर हा संवाद व्हावा, असेही वाटत असते.

अशा अनेक कारणांसाठी कोणते तरी सामान्य माध्यम उपलब्ध असावे लागते. शेरा ग्रंथालयाकडे समाजाची ही गरज म्हणून पाहतात. 'ग्रंथालय' हे एक व्यासपीठ होऊ शकते असे शेरा यांना वाटते आणि म्हणूनच ते सर्व प्रकार (All Forms) असा शब्द प्रयोग करतात.

हा संवाद ग्रंथालये कशी साधतात? १) विस्तारित कार्यक्रमाच्या (Extention cativities) माध्यमातून समाजाला हे माध्यम ग्रंथालये उपलब्ध करून देतात हे कार्यक्रम कोणते? त्याद्वारे संवाद कसा होतो?

(१) पुस्तक प्रदर्शन : नवीन /विषयानुसार
(२) इतर प्रदर्शन : हस्ताक्षर संग्रह /दुर्मीळ साहित्य /छायाचित्र संग्रह /नाणी संग्रह /चित्रे /कात्रण संग्रह
(३) पुस्तक विक्री :
(४) सुविचार :
(५) आजची बातमी :
(६) समारंभ : भाषणे /मुलाखती /करमणूकप्रधान कार्यक्रम
(७) कार्यक्रम : चित्रपट महोत्सव/नाट्यसंमेलन /चित्रफीत /CD यांचे सादरीकरण
(८) संमेलन : साहित्य /नाटय /विज्ञान/अंधश्रद्धा निर्मूलन
(९) शौक्षणिक : व्याख्यानमाला/परिसंवाद /चर्चासत्रे /प्रौढ शिक्षण/कायदा सल्ला
(१०) प्रशिक्षण : ग्रंथालयशास्त्र/(Reading habits) वाचन सवयी
(११) प्रकाशने : पुस्तिका - व्याख्यानमाला/भाषणे
नियतकालिके -
अहवाल -
सूची
परिसंवाद निबंध
संस्था इतिहस/ध्वनिफीत/चित्रफीत

## (१२) संशोधन

अशा अनेक कार्यक्रमांमधून ग्रंथालये निर्मिती (Producation), प्रवाह (Flow), एकात्मता (Intergation) आणि वापर (Consumption) साधतात आणि त्यातून विचारांचे संप्रेक्षण होते, असे शेरा यांना अभिप्रेत आहे.

**ज्ञान आणि सामाजिक क्रियाप्रक्रिया यामधील आदान -प्रदान**
**(Interaction between Knowledge and social activity)**

शेरा या दुसऱ्या घटकालाही फार महत्त्व देतात. ग्रंथालयातील तालिका /वाचनसाहित्य यांच्या माध्यमातून ज्ञानाशी आदानप्रदान होते हे अगदी उघड आहे, पण सामाजिक कार्य म्हणजे नेमकी कोणती क्रिया? समाजातील 'सामाजिक कार्य' हा अर्थ शेरांना अभिप्रेत आहे. या सामाजिक कार्याचा संबंध ग्रंथालयाच्या विस्तारित कार्यक्रमाशी आहे. पण ही Extention activity ही Intellectual activities च्या स्वरूपाची आहे. ग्रंथालयात इतर कार्यक्रम चालतात, त्यांचे स्वरूप कसे असते? समाजात निर्माण होणाऱ्या समस्या, घटना, घडामोडी, वर्तमान प्रश्न, सामाजिक चळवळी या कार्यक्रमाचे हे विषय होतात. या माध्यमातून समाजाशी संवाद साधला जातो. समाजाला मार्गदर्शन होईल असे याचे स्वरूप असते, कार्यक्रमांच्या माध्यमातून निर्माण होणाऱ्या ज्ञानबरोबर या सामाजिक कार्याचे आदानप्रदान होते, असे शेरा यांना अभिप्रेत आहे.

अशा आदानप्रदानामुळे समाजाला दिशा मिळते, समाज निकोप दृष्टिकोनाचा होतो. प्रश्नांचे, समस्येचे खरे स्वरूप त्यांच्यासमोर उघडे होते. एखादा विषयाचा सर्व बाजूंचा विचार समाजाला खुला होतो. यातून नवीन कार्याला चालना मिळते. संशोधन, लेखन, चळवळी, इतर सांस्कृतिक कार्यक्रम करणासाठी समाज उद्युक्त होतो. त्याचा पुरवठा पुन्हा ग्रंथालयांकडे होतो आणि हे वर्तूळ सुरूच राहते.

Social Epistemology चा अर्थ जो शेरा यांना अभिप्रेत आहे तो हा आहे आणि ही ज्ञानशाखा ग्रंथालयांनी समजून घेतली पाहिजे, असे शेरा यांना वाटते.

**शाब्दिक वा चित्रित नोंदीची सामाजिक उपयुक्तता (Social Utility of Graphic Records)**

ग्रंथालयांमध्ये वाचनसाहित्य निवड करताना सामाजिक भान राखले जाते. सामाजिक प्रश्नांच्या अनुषंगाने साहित्य जमा केले जाते. वर्तमान घटना

व घडामोडीविषयी साहित्य पुस्तकरूपाने येण्यास वेळ लागतो. म्हणून वर्तमान घटनांच्या संदर्भात कात्रणेही जमा केली जातात. त्यांचा संग्रहही केला जातो. याच्या जोडीला पुस्तक प्रदर्शन, कात्रणसंग्रह प्रदर्शन, छायाचित्रांची प्रदर्शने भरवली जातात; परंतु शेरा यांच्या मते हे पुरेसे नाही.

ग्रंथालयाला समाजाचे ज्ञान हवे. समाजातील महत्त्वाच्या प्रश्नांचे भान हवे. समाजाची वर्तमान गरज काय आहे ते ग्रंथालयाने ओळखायला हवे.

उदाहरणार्थ, पाण्याचा प्रश्न 'पाणी' ही समस्या अत्यंत गंभीर आहे. त्याची निकड सर्वच थरांतल्या व्यक्तींना जाणवते आहे. अशा वेळी ग्रंथालयांनी त्या प्रश्नावरील त्यांच्याकडे असणाऱ्या साहित्याचे प्रदर्शन भरवून ही गरज भागेल का? ते तितके पुरेसे नाही असे शेरा यांना वाटते.

'पाणी' या विषयावर चर्चा, परिसंवाद घडवून आणणे आवश्यक आहे. पाणी वाटपाचे संबंधित अधिकारी, शासन आणि समाजातील उपभोक्ता यांनी एकत्र आणून त्यावर संवाद साधायला हवा.

एखादा प्रास्ताविक निबंध (Background paper) तयार करून विविध व्यक्तींना विचार करायला लावायला आणि उपायाकडे जायला प्रवृत्त होईल, असा कार्यक्रम घडवून आणायला हवा.

आपल्याकडे असणाऱ्या साहित्यातून इतिहासात पूर्वी घडून गेलेली समांतर घटना शोधून त्याकडे समाजाचे लक्ष कसे जाईल असा कार्यक्रम घेता येणे शक्य करायला हवे.

'पाणी' संदर्भातील माहितीपट, काव्यवाचन, पथनाट्य यांचे आयोजन करायला हवे. व्याख्यानमाला घडवून समाजाचे प्रबोधन करण्याची गरज असते.

शेरा यांच्या मते समाजाला हे हवे असते. ग्रंथालयाने ही समाजाची गरज भागवली पाहिजे.

'इराक युद्ध', 'ग्लोब्लाझेशन', 'सार्स', इत्यादी अनेक ज्वलंत प्रश्नांकडे ग्रंथालयाचे लक्ष जायला हवे. केवळ संग्रह करून आणि प्रदर्शन भरवून हे कार्य तडीस जात नाही.

भले मग ग्रंथालयांनी कितीही उत्तम तालिका केलेल्या असोत, देशी - विदेशी ग्रंथ, नियतकालिके जमा केलेली असोत. ती हवीतच, पण त्याचबरोबर ही जाणीव हवी.

**ज्ञानाचे व्यवस्थापन (Management of Knowledge)**

याबाबतीत तर नक्कीच गोंधळ उडण्याची शक्यता आहे. ग्रंथालयात वर्गीकरण व तालिकीकरण यांच्या माध्यमातून 'ज्ञाना'ची व्यवस्था लावण्यात

येते. ती सुसंघटितही असते. वाचकाच्या मागणीनुसार साहित्य कमीतकमी वेळेत दिलेही जाते, व्यवस्थापनामुळेच घडते; परंतु शेरा यांना हे तर अपेक्षित आहेच; पण त्याहीपेक्षा अधिक वेगळे अपेक्षित आहे.

ग्रंथपालांची ग्रंथालयातील संग्रहीवर हुकूमत हवी. आपल्याकडे काय आहे, त्याचे महत्त्व नेमके काय हे त्याला माहीत असून चालत नाही, तर त्या ज्ञानाचा उपयोग फक्त ग्रंथालयात येणाऱ्या आणि त्या साहित्याची मागणी करणाऱ्यांनाच होईल असे न पाहत सर्व समाजाला त्याचा उपयोग कसा होईल हे ग्रंथालयांनी पाहायला हवे.

ग्रंथालयाचे आणखी महत्त्वाचे व केवळ ग्रंथालयांचेच व्यवच्छेदक कार्य म्हणजे त्या-त्या विषयातील तज्ज्ञालाही माहीत नसेल असे अथवा विस्मृतीत गेले असतील असे ग्राफिक रेकॉर्डस् उपलब्ध करून देणे. ग्रंथालयामध्ये मुक्तद्वार संकल्पना केवळ यासाठीच आणली जाते. ग्रंथालयात ज्ञानसाधनांचा साठा करून ठेवलेला नसतो, पण तो अशा रिताने मांडलेला असतो की, त्या त्या विषयाशी संबंधित, विषयावरील ग्रंथ स्थूलाकडून सूक्ष्माकडे अशा पद्धतीने (वर्गीकरण पद्धतीमुळे) मांडले जातात. संबंधित विषय त्याच्या मागे-पुढे असतात. ही मांडणी केवळ मागितलेला ग्रंथ सापडावा म्हणूनच केवळ नसते तर ज्ञानसाधनांच्या शोधात असलेल्या अभ्यासकाला ती निर्बंधपणे पाहण्यासाठी असते. अशा शोधामध्ये त्याला त्याच्या अभ्यासविषयक अपरिचित वा विस्मृतीत गेलेला ग्रंथ तर सापडतोच, पण ग्रंथांच्या शोधाच्या प्रक्रियेत असताना त्या विषयावर तो अंतर्मनात विचारही करीत असतो. अशा वेळी अचानक एखादा ग्रंथ असा सापडतो की, त्याच्या सुप्त विचाराला तो पोषक ठरतो किंवा त्या ग्रंथामुळे त्याला अचानक नवीन कल्पना, नवा मुद्दा, नवीच दृष्टी सापडते व त्याच्या संशोधनाला नवी दिशा प्राप्त होते. त्यामुळे ज्ञानाचा विस्तार होतो. ही प्रक्रिया ग्रंथालयात प्रामुख्याने घडते. ग्रंथालयात तो अभ्यास मोकळाही असतो. गरज भासल्यास लगेच तिथल्या तिथे त्याची वाचनाची सोय होते. तो ते पुस्तक घेऊन वाचत बसू शकतो अथवा सभासद असल्यास ते पुस्तक घरीही घेऊन जाऊ शकतो.

ग्रंथालयाद्वारे होणाऱ्या संप्रेषणाचे हे एक महत्त्वाचे अंग आहे. याला पोषक म्हणून ग्रंथालयात पुरेशी हवा, उजेड अथवा वातानुकूलित वातावरण अशी व्यवस्थाही पुरवली जाते. एकटयाने वाचायची सुविधा ही ग्रंथालयातली सर्वांत महत्त्वाची सुविधा असते. एकाग्रतेने वाचनसमाधी लागू शकण्याचे ते एक पवित्र व शांत ठिकाण असते. त्याच्या नवनिर्मितीला चालना, चेतावणी

देण्याचे कार्य ग्रंथालयातला ज्ञानसाठा करीत असतो आणि म्हणूनच शेरा ज्ञानाच्या व्यवस्थापनाला महत्त्व देतात.

## मानवजातीचा भलेपणा आणि कल्याण (Accomplishment and betterment of Mankind)

समाजमन काही वेळा संभ्रमित होते, गोंधळून जाते. समाजाची निरक्षर वृत्ती संपुष्टात येते. समाज काळाच्या ओघात मागे रेटला जाण्याची शक्यता असते. मूल्य व्यवस्थाच ढासळते. अनीतीलाच नीतिमत्तेचे रूप येते.

उदाहरणार्थ, आणीबाणीचा काळ, अश्लिलतेवरून येणारी सेन्सारशिप, भ्रष्टाचाराला मिळालेली प्रतिष्ठा अशा अनेक प्रसंगांत ग्रंथालयाने भूमिका घ्यायला हवी. समाजाला खरी स्थिती, सत्यता दाखवून द्यायला हवी. यासाठी ग्रंथपालाची/ग्रंथालयाची भूमिका समाजातील माणासांची मनोभूमिका उंचवण्याकडे असायला हवी.

प्रसारमाध्यमे अनेकदा अशा वेळी समाजाला संभ्रमित करून टाकतात. 'नेमके काय?' असा प्रश्न समाजाला प्रसारमाध्यमातील माहिती वाचून पडतो.

अशा वेळी कात्रणसंग्रहाचा अभ्यास करून इतर तात्त्विक साहित्याचे परिशीलन करून प्रसारमाध्यमांमधील विश्लेषणात्मक साहित्याचे समालोचन करून योग्य ती माहिती समाजापर्यंत अभ्यास वर्ग, Study Circle, पोस्टर प्रदर्शन, वस्त्यांमधील सभा, छोट्या समूहांच्या चर्चा, संसद, बाह्य संघटनांबरोबरचे कार्यक्रम घेऊन ग्रंथालयांना आपला वाटा उचलता यायला पाहिजे. शेरा यालाच "Expertly Done' आणि "Precise The Mechanism' म्हणत आहेत. हे लक्षात घ्यायला हवे.

## नवीन दृष्टी (New Insights)

ही नवीन दृष्टी Structuring, Organization आणि Availbility of human knowledge च्या संदर्भात ठेवायला हवी, असे शेरा सांगतात.

ज्ञानावर नजर ठेवणे, नवीन तयार होणाऱ्या ज्ञानाचा वेध घेणे आवश्यक ठरते. समाजात वेगवेगळे प्रवाह असतात. जुने प्रभाव मागे पडतात. एके काळी मागच्या सर्व पिढीवर मार्क्सच्या विचारांचा प्रभाव होता. आज तो प्रभाव मागे पडला आहे. दुसरेच प्रवाह कार्य करताहेत. दुसऱ्या महायुद्धाचा प्रभाव जगभर होता. त्याचा प्रभाव साहित्यावर पडला. त्यातून विफलतेचा अनुभव साहित्यातून वाहत होता. मार्क्सवादी साहित्यही पूर्वी जोमात होते.

आता समाजात कोणती विचारप्रणाली कार्यरत आहे? ती समाजाला उपयुक्त आहे का?नसल्यास समाजाला शिकवण्याची गरज निर्माण होते.

अशा जुन्या, नव्या विचारांचे साहित्य ग्रंथालयात नसेलही. मग काय करायचे? साहित्य नाही म्हणून गप्प बसायचे काय?

यासाठी शेरा नवीन दृष्टीची आवश्यकता मांडतात. जुना विचार जर आज आवश्यक वाटत असेल (उदाहरणार्थ, मार्क्सवाद) तर त्यातील जाणकारांना व्याख्यानांसाठी, भाषणांसाठी पाचारण करायला हवे. लोकसाहित्य, हरदास कथा, पुराण, कीर्तन, भारूड यांच्या माध्यमातून जुन्या-नव्या विचारांना समाजापर्यंत पोहोचवायला हवे. मौखिक इतिहासाच्या (Oral history) शाखेचा वापर करून जुन्या व्यक्तीचे संचित जमा करून ते समाजापर्यंत न्यायला हवे.

ग्रंथालयाला व्यक्तीला शिकवायचे नसून समाजाला शिकवायचे आहे. यासाठी 'नवीन दृष्टी'ची गरज आहे, असे शेरा यांना वाटते.

**भविष्यकालीन उपयोग (Anticipation of use and to engage activity)**

आपल्याकडील संग्रहाचा कोणाला, कोणत्या घटकाला उपयोग आहे याचा अंदाज घेता यायला हवा आणि ज्यांना त्याची गरज आहे अशांपर्यंत तो पोहोचवायला हवा.

हे उदाहरण घेऊनच पाहूया. समजा, ग्रंथालयामध्ये मजूर (Labour) या विषयावरची कात्रणे आहेत. ती फक्त ग्रंथालयात ठेवून काय होणार? त्याचा उपयोग व्हायला हवा, काहीतरी कार्य करायला हवे, यांचे उपभोक्ते कोण याचा अंदाज बांधून त्यांच्यापर्यंत हे ज्ञान नेले तरच त्याचा उपयोग होणार आहे.

**'मजूर' (Lobour) हा विषय कोणाला उपयुक्त ठरेल?**

(१) व्यक्ती : ग्रंथालयात येऊन जाणाऱ्या वाचकांचा गट

## (२) संस्था

२.१ शैक्षणिक संस्था उदाहरणार्थ, विद्यापीठे, विद्यापीठाचे Lobour Economics चे विद्यार्थी /प्राध्यापक, महाविद्यालये.

२.२ विषयांच्या संस्था उदाहरणार्थ, सेंट्रल लेबर संस्था, ट्रेड युनियन्स, प्रशिक्षण देणाऱ्या संस्था (Training Institutions)

२.३ देशाबाहेरील संस्था /राज्याबाहेरील संस्था

(३) नियतकालिके (Learned Periodicals)

(४) वर्तमानपत्रे (Newspapers)

(५) दूरचित्रवाणी

(६) शासनाकडे Think Tank साठी

(७) लेखक/स्तंभलेखक

(८) ज्ञानकोश वार्षिकांचे(Year Book)

(९) प्रकाशक

अशा संस्थांचा आधीच अंदाज बांधता येणे व आपला संग्रह उपयोगात कसा येईल ते पाहणे महत्त्वाचे आहे. याचा डेटाबेस तयार करून, सीडी तयार करून किंवा झेरॉक्स करून पाठवणे शक्य आहे. या संस्था संघटित संस्था (Organised Institutions) आहेत. समाजातील असंघटित (Unorganised) घटकांसाठी व्याख्यानमाला, प्रदर्शन, पुस्तिका छापून ही माहिती पाठवणे शक्य आहे.

**To search for and Adopt New Methods**

ग्रंथालयांनी आपल्या संग्रहाचा उपयोग व्हावा या दृष्टीने नवीन मार्ग शोधले पाहिजेत आणि ते स्वीकारलेही पाहिजेत. शेरा यांच्या मते, ग्रंथालयातील संग्रहाचा उपयोग हा फक्त विद्वानांनाच झाला पाहिजे किंवा त्यांनाच उपलब्ध केला पाहिजे असे नव्हे; तर व्यावसायिक, उद्योगपती, शासन यांनाही हा संग्रह उपलब्ध केला पाहिजे असे त्यांना वाटते. असे घडायचे असेल तर ग्रंथालयांनी नवीन उपाय किंवा पद्धती कोणती स्वीकारावी?कोणता शोध घेतला पाहिजे?

**ही पद्धतीही मांडता येणे शक्य आहे.**

संग्रहाचे अवलोकन करून त्या विषयाशी संबधित व्यक्तीच्या याद्या बनवता येतील. त्यासाठी नियतकालिके व पुस्तके यांचा आधार घेऊन त्यात लेखन करणारे यांचा एक गट संभाव्य उपभोक्ता म्हणून तयार करता येऊ शकतो. ती नियतकालिके वाचणारे वर्गणीदार शोधून त्यांचा एक गट बनवता येईल. त्या विषयाशी संबंधित संस्था, शैक्षणिक संस्था, विद्यार्थी व प्राध्यापक यांचीही यादी बनवणे सहज शक्य आहे.

अशी सिद्धता झाली की पुढे काय करायचे? त्या त्या गटांना आपल्या संग्रहाची माहिती करून घायची. उदाहरणार्थ,

(१) संग्रहाची यादी ही वर्णनात्मक ठेवणे व त्या गटाला पाठवणे.

(२) संग्रहातील माहितीचा सारांश गटाला पाठवणे.

(३) आवश्यकता असल्यास संपूर्ण संहिता (Full text) ही पाठवणे.

(४) त्यावर माहितीपुस्तिका तयार करणे.

(५) या संग्रहाची जाहिरात होईल असे मार्ग शोधणे. उदाहरणार्थ, आपल्या आणि दुसऱ्या ग्रंथालयात ही माहिती Display करणे.

(६) एखादे बुलेटिन सुरू करणे.

(७) महत्त्वाच्या विषयांवर परिसंवाद घडवणे. व्याख्यानमाला आयोजित करणे.

(८) पुस्तके तयार होण्याच्या दृष्टीने लेखकांना/प्रकाशकांना उद्युक्त करणे.

(९) त्या विषयावरील नियतकालिकांना ही माहिती पुरवून त्यांना त्याचा उपयोग करायला लावणे.

(१०) सामान्य माणसाला प्रवृत्त करायला, विचार करायला लावण्यासाठी वर्तमानपत्रांना हा संग्रह देणे. स्तंभलेखकांना त्यासाठी उद्युक्त करणे.

असे अनेक मार्ग शोधण्याची आणि ते स्वीकारण्याची आवश्यकता आहे. शेरा यांना अभिप्रेत असणारा Social Espistemology चा विचार अशा मार्गांनी कार्यान्वित होतो, होऊ शकतो.

## Shera's View about Library Techniques

शेरा गर ग्रंथालयाच्या तालिक पद्धतीला निकालात काढतात किंवा त्या माध्यमांना कमी महत्त्वाचे मानतात असे नाही. उलट त्याबाबत Douglas Foskett यांनी केलेल्या टीकेच्या संदर्भात शेरा ग्रंथपालांची बाजूच घेतात.

"Over the centruries library techniques and procedures have evolved slowly and pragmatically in response to assumed needs and patterned upon ad -hoc methods".

असे शेरा म्हणतात तेव्हा ग्रंथालयांनी केलेले -Analytical Index, Articles Indexes to perioical नजरेसमोर येतात. या साधनांना शेरा महत्त्व देतात; पण त्याबाबत त्यांचे मत असे आहे की, only rareely have libraries thought seriously of their libraries as social agencies असे म्हणून शेरा Foskett यांची टीका मांडतात.

as Douglas Foskett has said, they have failed to give serious consideration to the role of libraries (not merely public libraries) in a society, and how the professional community as a whole can best serve society as a whole"

शेरा यांच्या मताला पुष्टी देणारे हे Foskett यांचे विचार कोणालाही पटतील, कारण शेराही ग्रंथालयाकडे Social Agencies म्हणूनच पाहतात. पण शेरा Foskett यांच्या विधानावर काही प्रश्न निर्माण करून ग्रंथपालांची बाजू घेतात.

"This is very ture, but it may not be entirely the librarians' fault if they have nonthing to draw on for their practice but unvalidated assumptions -not to say guesses about the ways in which individuals and societies acquire knowledge and the networks by which knowledge and the networks by which knowledge is disseminated.What happens within that physiological process that take place when ahuman mind confronts a library store or the bibliographic tools that are intended assimilates become a part of the collective intelligence of culture? How is social behaviour influenced by the knowledge that society absorbs? These are the basic problems that confront the librarian and should guide his professional practice.Obviously librarians cannot seek unaided the answers to -such questions ; they must enlist the help of many specialists in many disciplines. In the largest sense, the proper study of librarianship is man".

शेरा यांनी उपस्थित केलेले प्रश्न तालिकेच्या बाबतीत अत्यंत महत्त्वाचे आहेत. वाचकाचा शोध, त्याला हवी असणारी माहिती व त्या माहितीकडे वाचक ज्या दृष्टीने पाहतो ती दृष्टी, ग्रंथपालाला अपरिचित असते. प्रत्येक वाचकानुसार ही दृष्टी बदलते. साहित्याचा जाणकार त्याच माहितीकडे वेगळ्या दृष्टीने पाहणार आणि तत्त्वज्ञानाचा अभ्यासक वेगळ्या दृष्टीने. तालिका तयार करताना ग्रंथपालाला वाचकाची भिन्न, भिन्न दृष्टी अनभिज्ञच असते व राहतेही.

यावर उपाय काय? शेरा म्हणतात की, ग्रंथपालने /वा ग्रंथालयाने वेगवेगळ्या विषयातल्या तज्ज्ञांची घ्यायला हवी अशी मदत घ्यायची तर अशा तज्ज्ञांना ग्रंथालयाच्या व्यवहारामध्ये सामील करून घ्यायला हवे.

दुसरे असे की तालिकापत्रांची मर्यादा ओलांडून विविध प्रकारच्या सूची प्रसिध्द करायला हव्यात त्यातून त्यातील मर्यादा काही प्रमाणात संपुष्टात येऊ शकतात.

शेरा यांचे शेवटचे वाक्य फार महत्त्वाचे आहे. "The proper study of librarianship is man' असे त्यांनी म्हटले आहे. 'माणसा'ला केंद्रस्थानी ठेवणे कोणत्याही ग्रंथालयाला महत्त्वाचे ठरणार आहे.

आणि माणसाचा, समाजाचा अभ्यास करणासाठी शेरा सांगतात त्याप्रमाणे Social Epistemology च्या ज्ञानशाखेची नितांत गरज आहे.

ही चर्चा लक्षात घेतल्यावर प्रश्न असा निर्माण होतो की शेरा यांची तत्त्वप्रणाली वापरून एखाद्या ग्रंथालयाचे विश्लेषण करणे शक्य आहे काय? ते ग्रंथालय कोणते असावे? तसे विश्लेषण करणे शक्य असेल तर त्याचे स्वरूप कसे असावे? याकडे वळणे सयुक्तिक होईल.

**Shera's theory and Survey of the Library**

शेरा यांची Social Epistemology ही संकल्पना वापरून एखाद्या ग्रंथालयाचे विश्लेषण करणे शक्य आहे. हे ग्रंथालय सार्वजनिक असायला हवे. इतर ग्रंथालये समाजातील काहीच समूहासाठी कार्य करताना दिसतात. मात्र सार्वजनिक ग्रंथालये मात्र बऱ्याच प्रमाणात शेरा यांच्या तत्त्वप्रणालीच्या जवळ जातील असे वाटते. अर्थात हे मत अभ्यासानंतर देणे शक्य आहे.

असा अभ्यास करायचा झाला तर काय करायला हवे?

(१) ग्रंथालयाचा इतिहास तपासावा लागेल.
(२) त्यांच्या Activities ची यादी करावी लागेल. त्या यादीचे विश्लेषण समाज उपयोगी किती प्रमाणात आहे ते तपासावे लागेल.
(३) ग्रंथालयाचा संग्रह व त्याचा समाजाच्या दृष्टीने केलेला उपयोग तपासणे.
(४) ग्रंथालयातील साधने व त्यासाठी असणारी दृष्टी.
(५) ग्रंथालयात अन्य काही विभाग आहेत का ते पाहावे लागेल.

(६) ग्रंथालयाची प्रकाशने, त्यांचे विषय व उपयोग.

(७) ग्रंथालयाचा वाचकवर्ग.

(८) ग्रंथालयाशी संबंधित समाजातील तज्ज्ञ माणसे.

अशा काही अंगांनी जर शोध घेतला तर ग्रंथालये शेरा म्हणतात त्या गोष्टींना पात्र ठरतात की नाही हे लक्षात येऊ शकेल.असल्यास त्याचे प्रमाण दाखवून देता येईल. नसल्यास काही सूचना देता येतील. अशा ग्रंथालयाचे Model तयार करून इतर ग्रंथालयांसाठी उपलब्ध करून देता येईल.

ग्रंथालयाची पाहणी केल्याशिवाय, त्यातल्या अडचणी लक्षात येणार नाही. काही वेळा असेही होण्याची शक्यता आहे की शेरा यांचा एखादा विचार 'आदर्श' असेल; पण त्याला प्रात्यक्षिकाची जोड देता येणे शक्य नसेल. किंवा ग्रंथालयाने प्रयोग केलाही असेल; पण त्याला समाजाने प्रतिसाद दिला नसेल.

हे सर्व तपासण्याची आवश्यकता आहे. काही वेळा शेरा म्हणतात वा अपेक्षा करतात त्यापेक्षा वेगळेही काही ग्रंथालयाने केलेले असू शकते. असे कार्यक्रम शेरा यांचा विचार समृद्ध करतील. पाहणीशिवाय हे शक्य नाही.

# ग्रंथालयामध्ये अर्गोनॉमिक्सचा वापर

**प्रा. मधुवन्ती भागवत**

*तंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे अलीकडे व्यवसायजन्य आजारांचे प्रमाण वाढले आहे. बैठे व अतिकाम या कारणांमुळे संगणक व्यावसायिकांना पाठदुखी, नेत्रविकार व मानेचे विकार, आदी विकार जडताना दिसतात. अशा व्यवसायजन्य आजारांतून ग्रंथालयीन कर्मचारीही सुटलेले नाहीत.*

*प्रस्तुत लेखात अर्गोनॉमिक्स म्हणजे काय, त्या विषयाचे महत्त्व व ग्रंथालयात त्याचा सुयोग्य वापर याचे विवेचन केले आहे.*

## व्युत्पत्ती, अर्थ व व्याख्या

अर्गोनॉमिक्स हा मूलत: ग्रीक शब्द आहे. त्यामध्ये दोन शब्द आहेत : 'अर्गोस' म्हणजे काम आणि 'नोमोस' म्हणजे नियम अथवा अभ्यास. सुयोग्य पद्धतीने काम करण्याचे शास्त्र म्हणजे अर्गोनॉमिक्स.

International Erognomics Association Executive Council, August 2000, नुसार, "Ergonomics (or human factors) is the scientific discipline concerned with the understanding of the interactions among human and other elements of a system, and the profession that applies theory, principles, data and methods to design in order to optimize human well-being and overall system performance."

Storey C. आणि Reg. G. यांनी ग्रंथपालाच्या दृष्टिकोनातून केलेली व्याख्या: "Ergonomics is a range of concepts which assist in maximising the design of the interaction of the human being with machines, systems, working methods and environments, while taking into account the safety, physical and mental capacity and productive potential of those same human operators."

थोडक्यात, कामाचा दर्जा उत्तम राहणे, मानवी अपघात-आजार टाळणे यासाठी कार्यालयातील वातावरण, कर्मचारी वापरत असलेले फर्निचर सुयोग्य असणे आवश्यक असते.

## विकास

काम करताना सोयीस्कर साधनांचा वापर करणे मानवाला नवीन नाही. हत्यारांची अचूक निवड व वापर हे पूर्वापार चालत आले आहे. व्यवसाय आणि सांध्यांच्या दुखापती यांतील नाते याची माहिती ४ शतकांपूर्वी नोंदवल्याचे संदर्भ आढळतात. बर्नार्डिनो रमाझिन्नी (१६३३-१७१४) ने काम करताना होणाऱ्या तक्रारीबद्दल लिहिले आहे. १८५७मध्यो पोलिश प्रोफेसर Wojcieh Jastrzebowski ने प्रथम अर्गोनॉमिक्स हा शब्द वापरला. १९व्या शतकाच्या सुरुवातीला शास्त्रीय दृष्टिकोनातून उत्पादनक्षमता वाढवण्याचे प्रयत्न सुरू झाले. फ्रेडरिक टेलर हे या बाबतीत अग्रणी मानले जातात. गिलब्रेथ दाम्पत्याने कार्यक्षमता वाढावी व कामगारांच्या शारीरिक श्रमात बचत व्हावी म्हणून काळ-काम-वेग, काम व त्यासाठी वापरत असलेल्या साधनांचा मेळ असला पाहिजे, एखादे काम करण्याची 'एकच उत्कृष्ट पद्धत' या तत्त्वाचा वापर केला. त्यांनी सुचवलेल्या उपायांमुळे विटा ठेवण्याच्या फेऱ्यांमध्ये १८ वरून ४.५ एवढी घट झाली आणि विटा उभारण्यात ताशी १२० वरून ताशी ३५० एवढी वाढ झाली. दुसऱ्या महायुद्धानंतर कामगार-मशीन यामध्ये मेळ साधण्याचे जाणीवपूर्वक प्रयत्न झाले. १९४९ मध्ये Ergonomics Research Society (आता The Ergonomics Society) ची स्थापना झाली. या क्षेत्रातील पहिले "Ergonomics" हे नियतकालिक १९५७मध्ये प्रसिद्ध झाली. १९५९मध्ये International Ergonomics Associationची स्थापना झाली. १९६०ते १९८०च्या काळात उत्पादनप्रक्रिया, ग्राहकोपयोगी वस्तू, संगणक या सर्व आघाड्यांवर प्रगती होत गेली. १९८०च्या दशकात संशोधकांचे लक्ष संगणक व कार्यालयीन वातावरण यांवर केंद्रित झाले.

## अर्गोनॉमिक्सची उद्दिष्टे

(१) व्यवसायाधिष्ठित अपघात कमी करणे.
(२) उत्पादनक्षमता वाढवणे.
(३) उत्पादन दर्जा वाढवणे.
(४) कर्मचाऱ्यांच्या अनुपस्थितीत घट करणे.

## निकड

(१) दीर्घ काळ बैठे काम करायची गरज असणाऱ्या नोकऱ्यांमध्ये लक्षणीय वाढ.

(२) प्रत्येक क्षेत्रातला संगणकाचा अनिवार्य वापर.

(३) उत्पादनक्षमता, केलेल्या कामाचे समाधान, कर्मचाऱ्याचे आरोग्य यांविषयीची वाढती जाणीव.

अर्गोनॉमिक्स्मध्ये खालील बाबी तपासल्या जातात :

(१) कार्यालयीन वातावरण
 - (क) शारीरिक हालचाली (उदा. वस्तू उचलणे, हलवणे)
 - (ब) कौशल्य (उदा. प्रति मिनीट ११० शब्द टाईप करणे.
 - (क) जोखीम पत्करणे. (उदा. उंच इमारतीवर रंगकाम करणे.)
 - (ड) वेळ पाळणे. (उदा. दिलेले काम ठराविक वेळेत पूर्ण करावी.)

(२) मनोसामाजिक वातावरण
 - (अ) सामाजिक (उदा. संघभावनेने काम करणे.)
 - (ब) सांस्कृतिक (उदा. देशानुरूप बदल)
 - (क) जीवनशैली (उदा. देशानुसार कामाच्या, मनोरंजनाच्या संकल्पना)

(३) भौतिक वातावरण
 - (अ) भौतिक बाबी (उदा. तापमान, आवाज)
 - (ब) रासायनिक बाबी (उदा. प्रदूषण करणारे घटक)
 - (क) जैविक (उदा. हवेतून पसरणारे विकार)

(४) तांत्रिक बाबी
 - (अ) उत्पादनाचा आराखडा (Product Design)
 - (ब) हार्डवेअर इंटरफेस डिझाईन (उदा. ग्राहकांच्या पसंतीस उतरेल असे उत्पादन)
 - (क) सॉफ्टवेअर इंटरफेस डिझाईन (उदा. ग्राहकांच्या सोयीसाठी बनवलेली संगणक प्रणाली)

थोडक्यात, अर्गोनॉमिक्सचा मुख्य हेतू कर्मचारी व तो वापरत असलेले यंत्र/उपकरण/साधन/त्याची बैठक/कार्यालयीन वातावरण या सर्वांचा मेळ घालणे हा आहे. याचा दृश्य परिणाम कर्मचाऱ्याचे आरोग्य उत्तम राहून कार्यक्षमता व उत्पादनक्षमता वाढण्यात होतो.

## ग्रंथालयीन अर्गोनॉमिक्स

ग्रंथालयीन कर्मचाऱ्यांना खालील गोष्टींमुळे स्नायूंचे विकार जडू शकतात.

(१) संगणकावर सतत डेटा एन्ट्री करणे, बार कोड स्कॅनर वापरणे यामुळे कार्पेल टनेल सिंड्रोम होऊ शकतो.

(२) दीर्घ काळ अवघडलेल्या स्थितीत बसून काम करणे, संगणकाचा की बोर्ड योग्य उंचीवर नसणे, सतत हात उंच करून पुस्तकांचे शेल्व्हिंग करावे लागणे, यामुळे खांदे-हात यांच्या स्नायूंवर, मज्जातंतूवर ताण येतो.

(३) सतत लिखाणामुळे, झेरॉक्सिंग करण्यामुळे, जाड पुस्तके स्कॅनरवर दाबून ठेवल्यामुळे, एकाच विशिष्ट कोनात टेलिफोन धरून बोलण्यामुळे मानदुखी, हातदुखी होऊ शकते.

(४) पुस्तकांची ने-आण करताना, पुस्तके पकडणे, उचलणे, वाकून शेल्व्हिंग करणे, ट्रॉली ढकलणे यामुळे पाठदुखी जडू शकते. देवघेव विभागातील कर्मचाऱ्यांना याचा विशेष धोका आहे.

(५) संगणकावर सतत काम केल्याने मानदुखी, पाठदुखी, नेत्रविकार, मनगटावर ताण येऊ शकतो.

यासर्वांचे पर्यवसान हातांची, बोटांची पकड कमी होणे, सूच येणे, मुंग्या येणे, बधीर होणे, इत्यादींत होते.

## ग्रंथालयातील फर्निचर

### (१) खुर्च्या

ग्रंथालयातील खुर्च्या ह्या सुखद/आरामदायी असाव्यात. सरळ पाठीच्या, कडक बैठक असलेल्या खुर्च्या दीर्घ काळ बसून काम करणाऱ्या सेवकाला त्रासदायी ठरतात. खुर्चीवर बसल्यानंतर कर्मचाऱ्याच्या पाठीचा कणा ताठ राहिला पाहिजे, त्याचे पाय जमिनीवर टेकले पाहिजेत. टेबलाच्या मानाने खुर्ची उंच असेल तर कर्मचाऱ्याला पुढे झुकून/वाकून काम करावे लागते. खुर्चीचे आसन (Seat) अरुंद नसावे. PVC खुर्च्या किमतीच्या व स्वच्छतेच्या दृष्टीने किफायतशीर असल्या तरी कापडी आवरण असलेल्या खुर्च्या आरामदायी असतात. खुर्चीची उंची सरकवून वर-खाली करण्याची सोय असली तर अधिक उत्तम. तज्ज्ञांनी हात असलेली खुर्ची, जिचे आसन ४०० मिमी. रुंद

आहे. उंची ४२० ते ५०० मिमी. पर्यंत सरकवण्याची सोय आहे व जिला चाराऐवजी पाच पाय आहेत अशा खुर्चीची शिफारस केली आहे.

**(२) टेबल**

ग्रंथालयात एकाच पद्धतीचे डेस्क/टेबल सर्व कर्मचाऱ्यांसाठी व सर्व प्रकारच्या कामासाठी खरेदी केलेले असतात. बहुतेक ठिकाणी संगणकही त्यावरच ठेवला जातो. त्यामुळे इतर काम करायला गैरसोय होऊ शकते. वाचकांसाठी OPAC सर्चकिरता, ग्रंथालयीन कर्मचाऱ्यांसाठी कामाच्या गरजेनुसार टेबलाची रुंदी, उंची असल्यास त्याचा फायदा होईल.

**(३) फूटरेस्ट्स**

टेबल-खुर्चीइतकेच फूटरेस्ट्स महत्तचे असून देखील त्याकडे क्वचित दुर्लक्ष केले जाते. फुटरेस्ट्स पायाला आरामदायी ठरतात. विशेषत: उंची कमी असलेल्या कर्मचाऱ्यांचा पायावरील ताण कमी करण्यात फूटरेस्ट्सचा उपयोग होतो.

**(४) शेल्व्हिंग**

प्रत्येक ग्रंथालयामध्ये ग्रंथसाहित्याचे शेल्व्हिंग हा अत्यावश्यक भाग असतो. पुस्तकांची मांडणी ही हाताळायला, ठेवायला-काढायला सोयीस्कर व उपयुक्त असावी लागते. अती उंची रॅक्स व जमिनीलगतचे रॅक्स यादृष्टीने गैरसोयीचे ठरतात. दोन रॅक्समधील अंतरही योग्य असल्यास वाचकांना पुस्तके चाळायला, कर्मचाऱ्यांना वापरायला सोपे पडते (आदर्श अंतर ९१०-९२०) मिमी. इतके मानले जाते.)

**(५) प्रकाशयोजना**

ग्रंथालयाच्या रचनेत प्रकाशयोजना हा महत्त्वाचा घटक आहे. नैसर्गिक प्रकाश-योजना वाचकांच्या दृष्टीने सगळ्यात उत्तम ठरते. शक्य असल्यास वाचकांची बसण्याची सोय खिडकीजवळ करावी. वाचनकक्षात ४०० ते ६०० लक्स इतका प्रकाश उत्तम समजला जातो. कृत्रिम प्रकाशयोजना करावयाचवी

असल्यास, सर्व प्रकारचे ग्रंथ वाचायला सोपे जावेत, वाचकाला लिहिताना त्रास होणार नाही, डोळ्यांवर ताण येणार नाही, इतक्या क्षमतेचे दिवे असावेत.

पुस्तकावर थेट सुर्यप्रकाश अथवा पाऊस येणार नाही याची काळजी घेतलेली असावी.

**(६) आवाज**

ग्रंथालयात नेहमी शांतता पाळावी असा संकेत आहे. फॅक्स मशीन, फोन, प्रिंटर, कर्मचाऱ्यांचे आवाज कमीत कमी असावेत. ग्रंथालयात ४५ डेसिबल्स इतक्या क्षमतेचा आवाज सर्वमान्य आहे. सतत वाजणारा फोन, प्रिंटरचे आवाज यांनी वाचकांची एकाग्रता कमी होऊ शकते. तीव्र आवाजामुळे डोकेदुखी, तणाव, उच्च रक्तदाब, इत्यादी तक्रारी उद्‌भवू शकतात.

**(७) तापमान**

ग्रंथालयात २० ते २२ सेल्सिअस एवढे तपमान असावे. अतिशीत तसेच अतितप्त तापमान आरोग्यासाठी अपायकारक ठरते. ग्रंथालयीन कर्मचारी तसेच दीर्घ काळ वाचन करणाऱ्या वाचकांना अशा तापमानाचा त्रास होतो.

**(८) खेळती हवा**

आधुनिक ग्रंथालयात जर एअर कंडिशनर्स बसवले असतील तर बंद खिडक्यांमुळे ग्रंथालयात कोंदटपणा येण्याची शक्यता असते. ग्रंथालयात हवा स्वच्छ, खेळती असावी. योग्य प्रकाश व खेळती, प्रसन्न हवा कर्मचाऱ्यांना दिवसभर काम करण्यासाठी उत्साही ठेवते. सतत बंद असलेल्या वातावरणात सांसर्गिक आजार पसरण्याचा धोका असतो. झेरॉक्स मशीन्स, संगणक यांतून निर्माण झालेल्या उष्णतेचाही कर्मचाऱ्यांना त्रास होऊ शकतो.

**(९) आर्द्रता**

ग्रंथालयातीला हवेमध्ये ५०-५५% इतकी आर्द्रता असावी. अति कोरड्या हवेमुळे ग्रंथसाहित्याची हानी होऊ शकते. तसेच ७०% हून अधिक आर्द्रता असल्यास मायक्रोफिल्म्स/मायक्रोफिश/सतत न हाताळलेली पुस्तके यांवर बुरशीचा प्रादुर्भाव होऊ शकतो.

**(१०) फ्लोअरिंग**

फर्निचर सरकवणे, वाचकांची वर्दळ, त्यांच्या पायांचा आवाज, रोजची स्वच्छता या सर्वांसाठी उपयुक्त ठरेल असे फ्लोअरिंग ग्रंथालयात असावे. फ्लोअरिंगची रंगसंगतीही डोळ्यांसाठी सुखद असावी. काही ग्रंथालयात जाड कार्पेट घातले जाते. तसे असल्यास कार्पेटची व्यवस्थित निगा राखली जावी. कार्पेटमध्ये धूळ, इतर कचरा अडकण्याची शक्यता असते. त्यामुळे कर्मचाऱ्यांना दम्यासारखे श्वसनविकार होऊ शकतात.

**(११) संगणक**

संगणकाच्या अतिवापरामुळे होणारे दुष्परिणाम यावर विपुल संशोधन, लेखन उपलब्ध आहे. यासंबंधी थोडक्यात माहिती परिशिष्ट-१ मध्ये दिली आहे.

**(१२) अंतर्गत मांडणी**

ग्रंथालयातील रंगसंगती, फडदे, फर्निचरची मांडणी वाचकांना आश्वासक, आकर्षक वाटेल अशी असावी. कॅटलॉग कॅबिनेट्स, संगणक, (OPAC साठी), देवघेव विभाग यासर्व मांडणीमध्ये योग्य अंतर असावे. वाचकांसाठी एकच लांब टेबल नसावे असे एक निरीक्षण सांगते. संशोधकांना, दीर्घ काळ बसणाऱ्या वाचकांसाठी स्वतंत्र 'क्युबिकल्स'ची सोय असावी.

**(१३) सूचना/मार्गदर्शक पुस्तक**

साधारण २० फूट अंतरावरून वाचता येतील असे फलक असावेत. फलकावरील मजकूर बिनचूक असावा. त्यात संदिग्धता नसावी. अन्यथा त्याच शंकांना उत्तरे देण्यात कर्मचाऱ्यांचा वेळ जाईल. आकर्षक सूचनाफलकांमुळे वाचकांच्या मनात ग्रंथालयाची उत्तम प्रतिमा निर्माण होते.

**(१४) देवेघेव विभाग**

या विभागात वाचकांची सतत वर्दळ असते. त्यादृष्टीने या विभागाची रचना असावी. 'काउंटर'पुढे वाचकांना उभे राहायला पुरेशी जागा असावी. टेबलाची उंची योग्य असावी. परत अलेल्या पुस्तकांसाठी जागा स्वतंत्र पण

कर्मचाऱ्याला सोयीस्कर अशी असावी. अन्यथा त्याला वरचेवर खाली वाकून पुस्तके ठेवावी लागतील किंवा मागे वळून मागच्या कपाटात/शेल्फवर/ ट्रॉलीवर ठेवावी लागतील.

## सारांश

अर्गोनॉमिक्स हा आंतरशाखीय विषय आहे. तो कर्मचाऱ्यांची शारीरिक स्थिती कार्यालयीन वातावरण-रचना-फर्निचर, इत्यादी सगळ्या घटकांशी जोडला गेला आहे. आज या विषयावर संशोधन चालू आहे. विपुल प्रमाणात लेख उपलब्ध आहेत. तरी तुलनेने 'ग्रंथालय अर्गोनॉमिक्स' वर कमी प्रमाणात साहित्य उपलब्ध आहे. ग्रंथालय कर्मचारी या विषयाबद्दल अधिक जागरुक होण्याची गरज आहे. अर्गोनॉमिक्सचा जाणीवपूर्वक प्रयत्न/वापर केल्यास कर्मचाऱ्यांचे आरोग्य उत्तम राहून त्यांची कार्यक्षमता वाढेल.

## संदर्भसूची


(1) Karwowski, W. Ergonomics and human factors : the paradigms for science, engineering, design, technology and management of human compatible system. Erogonomics, vol. 48, No. 5, 15 Apr. 2005, P. 436-463.

(2) Rooney, James. Ergonomics in acdemic libraries. Library Management, vol. 15, No. 1, 1994, P. 26-35.

(3) Rose, T. Ergonomics in the Library, Library Journal, vol. III, No. 17, 1986. P. 54-55

(4) शिकापूरकर, दीपक आणि मराठे उज्ज्वल, आधुनिक माहिती तंत्रज्ञानाच्या विश्वात, पुणे, उत्कर्ष प्रकाशन, २००३.

(5) www.drcris.com

(6) www.ergoweb.com

# सार्वजनिक ग्रंथालयांसाठी काही नावीन्यपूर्ण उपक्रम

**डॉ. राजेंद्र कुंभार**
प्राध्यापक, ग्रंथालय आणि माहितीशास्त्र विभाग
सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ
kumbharrajendra@yahoo.co.in

*अधिक परिणामकारक आणि समाजोपयोगी होण्यासाठी तसेच आपले यशस्वी अस्तित्व टिकविण्यासाठी सार्वजनिक ग्रंथालयांनी नवनवीन, नावीन्यपूर्ण उपक्रम योजले पाहिजेत. सदर लेखामध्ये हरित ग्रंथालये, कन्या आणि महिलारत्न ग्रंथालये, आरोग्य ग्रंथालये, बालवैज्ञानिक ग्रंथालये, पालक-वाचन सल्ला केंद्र, लेखन कार्यशाळा, ग्रंथविक्री केंद्र, बाल आणि वृद्ध वाचकांसाठी वाचनसेवा, इत्यादी नावीन्यपूर्ण उपक्रमांद्वारे सार्वजनिक ग्रंथालये आपली उपयुक्तता कशी वाढवू शकतात याचे सविस्तर विवेचन केले आहे. नावीन्यपूर्ण उपक्रम राबविण्यासाठी शासन आणि इतर सामाजिक संस्था यांनी काय केले पाहिजे याबाबत थोडक्यात अपेक्षा व्यक्त केल्या आहेत.*

**प्रस्तावना**

सार्वजनिक ग्रंथालये मुलतः दोन उद्देशाने अस्तित्वात आली. एक म्हणजे नागरिकांना मोफत वा कमीत कमी शुल्कामध्ये वाचनसाहित्य पुरविणे आणि दुसरे म्हणजे वाचनसुविधा विशेषतः वाचनासाठी जागा आणि फर्निचर उपलब्ध करणे. पहिल्या सेवेमुळे त्यांना ग्रंथालये तर दुसऱ्या कारणामुळे त्यांना वाचनालये वा अभ्यासिका असे संबोधले जाते. शतकाहून जास्त काळापासून सार्वजनिक ग्रंथालये भारतीय समाजाला वाचनसुविधा पुरवीत आहेत. तत्कालीन समाजसुधारकांच्या दूरदृष्टीमुळे भारतामध्ये शिक्षणाचा प्रसार झाला. शिक्षणासाठी सहायक सुविधा म्हणून ग्रंथालयांचा विकास झाला. औपचारिक शिक्षणामध्ये तसेच संशोधनामध्ये

ग्रंथालय सुविधेचा फायदा अधिक स्पष्टपणे जाणवतो. त्यामुळे सार्वजनिक ग्रंथालयांच्या तुलनेत शैक्षणिक आणि संशोधन ग्रंथालय यांचा अधिक विकास झाला. सार्वजनिक ग्रंथालये समाजविकासासाठी अधिक उपयुक्त असूनसुद्धा योग्य शासकीय धोरणांअभावी आणि आर्थिक पाठबळाअभावी त्यांचा भारतामध्ये समाधानकारक विकास झालेला नाही.

थोडेसे निराशाजनक चित्र असले तरी सार्वजनिक ग्रंथालयांच्या बाबतीत अगदीच सर्वकाही बिघडले आहे असे मात्र मला वाटत नाही. कारण आपल्या देशात, अर्थात महाराष्ट्रातसुद्धा, विशेषतः स्वातंत्र्यानंतर सार्वजनिक ग्रंथालयांची संख्या फार वाढलेली आहे. त्यांच्याकडील वाचनसाहित्याची संख्या आणि विविधताही वाढलेली आहे. एवढेच नाही तर त्यांच्या उपक्रमांची विविधता आणि प्रमाणही वाढले. केंद्र आणि राज्य शासनांनी नवीन धोरणांची आणि उपक्रमांची अंमलबजावणी करून सार्वजनिक ग्रंथालयांच्या विकासाला त्यांच्यापरीने भरीव योगदान यापूर्वी दिलेले आहे, सध्या देत आहेत. मला खात्री आहे की यापुढेही ते देत राहतील.

असे म्हटले जाते की, बदल ही एक सातत्याने घडणारी बाब आहे. बदल हा सजीवत्त्वाचा निर्देशक आहे. त्यामुळेच जीवनाच्या सर्वच क्षेत्रांमध्ये, पैलूमध्ये सतत काहीना काही बदल होत असतो. काही बदल लादले जातात तर काही स्वयंस्फूर्तीने घडवून आणले जातात. अर्थात् बदल कोणताही असो, बदल आला की आव्हाने आलीच. सार्वजनिक ग्रंथालयेही बदलाच्या परिणामांपासून दूर राहू शकत नाहीत. सभोवतालची आर्थिक, सामाजिक, तांत्रिक शैक्षणिक, राजकीय परिस्थिती बदलत आहे आणि या बदलांना सामोरे जाण्यासाठी सार्वजनिक वाचनालयांना बदलणे गरजेचे झाले आहे. विशेषतः इंटरनेट हे साधन सार्वजनिक आणि इतर ग्रंथालयांना एक आव्हान म्हणून विकसित होत आहे. इंटरनेट ग्रंथालयांना एक पर्याय होऊ पाहत आहे. अशा या बदललेल्या परिस्थितीत यशस्वीपणे टिकण्यासाठी सार्वजनिक ग्रंथालयांनी त्यांच्या सध्याच्या सेवा आणि उपक्रमांमध्ये परिस्थितीनुरूप बदल केले पाहिजेत. नावीन्यपूर्ण उपक्रम राबविले पाहिजेत. सदर लेखामध्ये काही नावीन्यपूर्ण उपक्रमांचे वर्णन केले आहे. यातील काही उपक्रम काही सार्वजनिक ग्रंथालये राबवीत असण्याची शक्यता मी नाकारत नाही.

### सार्वजनिक ग्रंथालयांसाठी नावीन्यपूर्ण उपक्रम

एखादी संपूर्ण नवीन संकल्पना, योजना राबविणे म्हणजे नावीन्यपूर्ण उपक्रम. जर पूर्वीचीच सेवा वा उपक्रम नवीन पद्धतीने राबविण्यात येत असेल, तर त्यालाही नावीन्यपूर्ण उपक्रमच म्हणता येईल. विशेषतः चमत्कारिक किंवा आश्चर्यकारक किंवा ज्याला 'मॅड' म्हणता येईल अशी योजना राबविणे म्हणजेही नावीन्यपूर्णताच असते. आजच्या यशस्वी व्यावसायिक जगाकडे तसेच वैज्ञानिक जगाकडे व्यवस्थित पाहिले तर तुमच्या लक्षात येईल की, आजचे बहुतांश व्यवसाय, व्यावसायिक योजना एवढेच नाही तर बहुतांश वैज्ञानिक शोधसुद्धा सुरुवातील 'मॅड कल्पना' म्हणून संबोधले गेले होते. मला वाटते की, आता वेळ आली आहे की सार्वजनिक ग्रंथालयांनीही नवीन, आश्चर्यकारक परंतु अधिक उपयुक्त सेवा/उपक्रम राबवून आपले अस्तित्व यशस्वीपणे टिकवावे. सार्वजनिक ग्रंथालयांनी प्रयत्न करण्यायोग्य काही नावीन्यपूर्ण उपक्रम खालीलप्रमाणे सांगता येतील.

### गृहपाठ सुविधा केंद्र

बाल वाचक हा सार्वजनिक ग्रंथालयांचा सध्या एक दुर्लक्षित वाचकवर्ग आहे, असे म्हटले तर ते वावगे ठरणार नाही आणि म्हणून सध्याच्या सार्वजनिक ग्रंथालयांनी बाल वाचकांसाठी जास्तीत जास्त उपक्रम राबविले पाहिजेत. याची अनेक कारणे आहेत. आपल्याकडील शालेय ग्रंथालये अपेक्षेएवढी विकसित झालेली नाहीत, हे दुर्दैवाने का होईना आपणास मान्य करावे लागेल. अशा परिस्थितीत एकतर पालकांनी मुलांच्या वाचनावर अधिक खर्च केला पाहिजे किंवा सार्वजनिक ग्रंथालयांनी तरी बालकांना समाधानकारक वाचनसुविधा पुरविल्या पाहिजेत.

बाल वाचक त्याचे बहुतांश वाचन हे त्यांच्या अध्ययन प्रक्रियेचा अत्यावश्यक भाग म्हणून करत असतात. गृहपाठ हा अध्यापन-अध्ययन प्रक्रियेचा एक महत्त्वाचा भाग आहे. शाळेची मर्यादित वेळ (दोन शिफ्टमध्ये शाळा चालविण्यात येत असल्यामुळे), विद्यार्थ्यांना आवश्यक असलेला अधिकचा सराव, अभ्यास आणि अध्ययन पद्धतीची आवश्यकता, इत्यादींमुळे गृहपाठ ही शालेय शिक्षणातील एक अत्यंत आवश्यक कृती झाली आहे. नोकरी करणाऱ्या मातांची संख्या

दिवसेंदिवस वाढत आहे. बहुतांश कुटुंबामध्ये आजी-आजोबांची अनुपस्थिती प्रकर्षाने जाणवत आहे. एक मूल असलेल्या कुटुंबामध्ये तर मोठी बहीण किंवा मोठा भाऊही नसतो. अशा परिस्थितीत शाळेतून घरी आलेल्या विद्यार्थ्याचा गृहपाठ कोणी करून घ्यावयाचा ही एक मोठी समस्या निर्माण झाली आहे. आर्थिक कुवत असणारे पालक त्यांच्या मुलांना शिकवणी वर्गाला पाठवून या समस्येवर मार्ग काढत असतात, परंतु सर्वच पालकांना या सुविधेचा लाभ घेता येतो असे नाही.

सार्वजनिक ग्रंथालये, पालकांना आणि पर्यायाने समाजाला या बाबतीत मदत करू शकतात. यासाठी सार्वजनिक वाचनालयांनी चक्क गृहपाठ सुविधा केंद्र काढावे असे मला वाटते. माझ्या कल्पनेप्रमाणे हे गृहपाठ सुविधा केंद्र पुढीलप्रमाणे कार्य करू शकेल.

वेळ : सार्वजनिक वाचनालयामध्ये गृहपाठ सुविधा केंद्र सकाळी ९ ते ११ आणि दुपारी ३ ते ५ यावेळेत कार्यरत असावे.

सुविधा : जागा, टेबल, खुर्च्या, लाईट, संगणक, शिक्षण सहायक (Learning Assistant) (दादा किंवा ताई) असावेत.

**कार्यपद्धती** : विद्यार्थ्याने त्याच्या शाळेच्या वेळेव्यतिरिक्त सार्वजनिक ग्रंथालयात यावे. सार्वजनिक ग्रंथालयाने जागा, टेबल, खुर्च्या आणि लाईट, इत्यादी मूलभूत सुविधांबरोबर आणखी दोन सुविधा उपलब्ध कराव्यात. एक म्हणजे इंटरनेट सुविधेसह संगणक उपलब्ध करावा. आताची सार्वजनिक ग्रंथालयाची स्थिती पाहता हे शक्य आहे. ज्या सार्वजनिक ग्रंथालयांना सध्या ही सुविधा देणे शक्य नाही त्यांना शासनाने, राजकीय पक्षांनी, सामाजिक संस्थांनी यासाठी मदत करावी. दुसरी सुविधा म्हणजे शिक्षण सहायक (दादा किंवा ताई) उपलब्ध करणे. बहुतांश विद्यार्थ्यांना गृहपाठ पूर्ण करण्यासाठी मदतीची गरज असते. शिक्षण प्रशिक्षण महाविद्यालयातील विद्यार्थ्यांची या कार्यासाठी मदत घेता येईल, कारण या विद्यार्थ्यांना तसेही पुढे शालेय विद्यार्थ्यांना शिकवायचे असते. सार्वजनिक ग्रंथालयाचा गृहपाठ सुविधा केंद्रामध्ये हे महाविद्यालयीन विद्यार्थी एक किंवा दोन तास विद्यार्थ्यांना गृहपाठ करण्यामध्ये मदत करू शकतात. यातून त्यांचे स्वतःचेही शिक्षण होईल. त्यांचा शिकवण्याचा अनुभव समृद्ध होईल. पाहिजेतर शासनाने या बाबतीत योग्य तो धोरणात्मक

निर्णय घ्यावा, ज्यामुळे सार्वजनिक ग्रंथालयांना गृहपाठ सुविधा केंद्रासाठी शिक्षण सहायक (दादा/ताई) सहजसुलभ उपलब्ध होतील. हे शक्य नसेल तर महाविद्यालयात आणि विद्यापीठामध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना सार्वजनिक ग्रंथालयाच्या गृहपाठ सुविधा केंद्रासाठी दररोज किंवा आठवड्यातून एक-दोन तास देण्याची विनंती करता येईल. पूर्वी टिच इंडिया उपक्रमांतर्गत एका संस्थेने महाविद्यालयीन आणि विद्यापीठीय विद्यार्थ्यांना अशा प्रकारच्या उपक्रमासाठी अवाहन केले होते आणि त्याला खूप चांगला प्रतिसाद मिळाला होता. एकाच गृहपाठ सुविधा केंद्रामध्ये एकावेळेस एकापेक्षा जास्त शिक्षण सहायक उपस्थित राहू शकतात आणि ते सर्व विविध विषयांचे (जसे विज्ञान, गणित, इंग्रजी, मराठी, इतिहास, इत्यादी) असतील तर आणखी उत्तम. कारण प्रत्येकाच्या विशेषीकरणाचा अभ्यासार्थींना फायदा होऊ शकतो.

शिक्षण सहायकांनी त्यांच्या स्वतःच्या आवडीच्या आणि अभ्यास असलेल्या विषयाचे गृहपाठ करण्यासाठी विद्यार्थ्यांना मदत करावी. आवश्यक असेल तेथे इंटरनेट सुविधेचा वापर करावा, त्यामुळे अद्ययावत माहिती तर मिळेलच शिवाय शालेय मुलांचा आणि पालकांचा गृहपाठ सुविधा केंद्रावरील विश्वास अधिक दृढ होईल. अर्थातच गृहपाठ विषयाबाबत अधिक माहिती मिळविण्यासाठी शालेय विद्यार्थ्यांनी आणि शिक्षण सहायकांनी संबंधित ग्रंथालयातील वाचनसाहित्याचा वापर करावा.

सार्वजनिक ग्रंथालयाच्या गृहपाठ सुविधा केंद्राचे अनेक फायदे मिळू शकतात. जसे, सर्व विद्यार्थी, शिक्षण सहायक आणि सार्वजनिक ग्रंथालयाच्या मदतीने एकत्रितपणे गृहपाठ करत असल्यामुळे सहअध्ययन होईल. एकट्याने केलेल्या अभ्यासापेक्षा एकत्रितपणे केलेला अभ्यास अधिक चांगला होण्याची शक्यता आहे. यामुळे समूहामध्ये, टीममध्ये कार्य करण्याची विद्यार्थ्यांची क्षमता अधिक विकसित होईल. सार्वजनिक ग्रंथालयातर्फे उपलब्ध केलेल्या अशा या गृहपाठ सुविधा केंद्रातील गृहपाठ प्रक्रियेत अनेक घटक सहभागी होत असल्यामुळे खरे तर या सुविधेला सार्वजनिक गृहपाठ मंडळ असेही म्हणता येईल. शाळेव्यतिरिक्त किमान आणखी एक दोन तास विद्यार्थी शैक्षणिक वातावरणात राहतील म्हणून पालकांना त्यांच्या पाल्यांची काळजी वाटणार नाही. काही पालकांना तर मुलांना शाळेव्यतिरिक्तच्या वेळेत कोठे ठेवावे हा

